


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



वर्ष २० वें : अंक २ रा

जुलै–सप्टेंबर १९४७



संपादक :
यशवन्त दिनकर पेंढरकर

अनुक्रमणिका



# कै. नरसिंह चिंतामण तथा तात्यासाहेब केळकर



कविवर्य ' बी ' ( BEE ) ह्यांना निवापाञ्जली देऊन ' पत्रिका ' विराम घेते -न घेते तोंच साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर यांच्या निधनाची शोकवार्ता देण्याचा दुर्धर प्रसंग तिच्यावर ओढवला आहे. दिनांक १४ ऑक्टोबर मंगळवार उजाडण्याच्या सुमारास हा साहित्यसूर्य अस्तंगत झाला. राजकारण आणि साहित्यकारण, इतकेंच नव्हे तर समाजजीवनाच्या हरएक कार्यकारणांत तात्यासाहेब आपल्या कर्तृत्वगुणांनी तळपत होते. महाराष्ट्राला महत्पदावर ठेवण्यासाठी ज्या धुरंधर बुद्धिसागरांनी आमरण ठाण मांडलें होतें त्यांत तात्यासाहेबांच्या योग्यतेचा धुरीण ह्या काळांत कोणी अन्य नसल्यामुळे त्यांच्या प्रयाणाने महाराष्ट्राची अपरिमित हानि झाली आहे.

बडोदें येथे १९२१ मध्ये भरलेल्या दहाव्या म. सा. संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत वाङ्मयापासून होणाऱ्या आनंदाची ' सविकल्प समाधि ' म्हणून त्यांनी केलेली मीमांसा अत्यंत संस्मरणीय ठरली, उद्बोधक ठरली. कोटिभास्कर कै. श्री. कृ. कोल्हटकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली पुणें येथे भरलेल्या म. सा. संमेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते. त्या वेळीं हे "दोन तात्या" व्यासपीठावर अग्रभागीं विराजमान झालेले पाहण्याचा सोहळा पुष्कळांना भाग्यविशेष वाटला असेल. " एखाद्या परंपरेचे, एखाद्या पीठाचे आद्य प्रवर्तक होण्याला जें अलौकिकत्व लागतें तें माझ्यांत नाही, तें कोल्हटकरांत आहे " अशा अर्थाच्या शब्दांनी त्यांनी कै. कोल्हटकरांचा त्या वेळीं जो गौरव केला तो त्यांच्या मनौदार्याचा, विनयशीलतेचा आणि अकृत्रिम मित्रप्रेमाचा निदर्शक होता.

खुद्द परिषदेचा प्रपंच नेटका व्हावा ह्यासाठी त्यांनी अनेक भूमिकांनी तिची सेवा बजावली आहे. ते १९१२, १९१५ व १९१७ ह्या सालीं कार्यकारी मंडळाचे सदस्य होते. उपाध्यक्षपद १९२२ पासून १९३७ अखेर त्यांनी पांच वेळां सांभाळलें. आणि १९३७ ते १९४२ या काळांत ते परिषदेचे अध्यक्षच होते. १९४१ सालीं माधवराव पटवर्धन स्मारक मंदिराच्या कोनशिला-स्थापनेचा समारंभ त्यांच्याच हस्तें झाला होता. त्यांच्या कामगिरीबद्दल परिषदेच्या इतिहासांत असा उल्लेख आहे की—

" सुप्रसिद्ध साहित्यधुरीण श्री. तात्यासाहेब केळकर हे पांचसहा वर्षे म. सा. परिषदेचे अध्यक्ष निवडून आले. हीं वर्षें परिषदेस मोठ्या भरभराटीचीं गेलीं आणि परिषदेच्या स्थापनेपासून तिच्याशीं संबद्ध असलेल्या केळकरांसारख्या लोकाग्रणीस संतोषदायक झालीं. तात्यासाहेबांची साहित्यिक मंडळांतील लोकप्रियता, त्यांची निरलसता आणि विद्वत्ता आणि कार्यपोषक स्वभाव यांच्या योगें परिषदेच्या कार्यकर्त्यांस त्यांचा केव्हढा आधार वाटत असेल याची सहज कल्पना येईल. त्यांच्या नुसत्या नांवावरहि ही कार्यकर्ती मंडळी अनेक उपक्रम हातीं घेऊन तडीस नेण्यास कंबर बांधीत. परिषदेच्या कार्यकर्त्यांच्या हाकेला तात्यासाहेबांनी ' ओ ' दिली नाही असें घडलेंच नाही. "

हा आधार आज नाहीसा झाला असें, परिषदेप्रमाणे, शोकमूढ झालेला महाराष्ट्र—कोणत्याहि क्षेत्रांतला महाराष्ट्रीय— म्हणेल आणि हळहळतांना वरील उक्तीचाच अनुवाद करील.

ईश्वर त्यांच्या आत्म्यास चिरशांति देवो.

——संपादक

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष २० वें ] जुलै-सप्टेंबर १९४७ [ अंक २ रा


## मराठवाड्याची जपमाळ

रा. सा. र. लु. जोशी.

ज्यांनी दिव्य रवें अमूप कवनें गोदातटीं गायिलीं
देवी ! भाव समग्र एकवटुनी पूजा तुझी बांधिली
ज्यांचे बोल अमोल नित्य घुमती लोकां रिझोनी सुखें
त्यांचे पाहति आजि वंशज अहा होऊं तुला पारखे

योगक्षेम कितीतरी जुळविण्या ध्याती अविधा गिरा
नेणोनी भ्रमपूर्ण सत्त्व हरण्या निष्णात ही वागुरा
कोणा भाळवि लाघवी ढव तिची अंतर्गृहीं ही रिघे
"भाषा ही परकी न, काय बिघडे ?" उद्गारती कोडगे

ग्रासाया तुज नित्य राजवट ही उद्युक्त नानापरी
औदासीन्य परी असें निरखितां भीती थरारे उरीं
देवी ! तोंचि फुटे स्फुरोनि तुझिया स्फुल्लिंग नेत्रांतुनी
एकामागुनि एक पेटति सर्वें* ज्योती क्रमें चेतुनी

वन्ही हा धुमसो सदैव पसरो, व्यापो महाराष्ट्रिया
देवी ! राज्य तुझें पुन्हा अवतरो, देवो अम्हांला जया.

---

स्वयंस्फूर्तीने.

अनुक्रमणिका



## वैतालीयाचें लक्षण ?

लें०— श्री. य. ग. फफे, पुणें.

संस्कृत छंदोमंजरी आणि वृत्तरत्नाकर या ग्रंथांत वैतालीयाचें लक्षण पुढीलप्रमाणे दिलें आहेः—

षट् विषमेऽष्टौ समे कलाः । ताश्च समे स्युर्नो निरन्तराः ॥
न समाऽत्र पराश्रिता कला । वैतालीयेऽन्ते रलौ गुरुः ॥

आपटे ह्यांच्या संस्कृत-इंग्रजी कोशांत हेंच लक्षण उद्धृत केलें आहे. मात्र त्यांतील दुसरा चरण "ताश्चसमेस्युर्निरन्तराः" असा छापलेला आहे. म्हणजे ह्यांत मूळांतलें नो हें अक्षर गळलें आहे. पण हा उघड मुद्रादोष होय.

छंदोमंजरी आणि वृत्तरत्नाकर यांत ज्या छंदाचें लक्षण त्याच छंदांत देण्याची पद्धति आहे, त्याप्रमाणे वरील लक्षणपद्य वैतालीय छंदांतच असलें पाहिजे, म्हणजे प्रस्तुत लक्षणपद्य हें वैतालीयाचें उदाहरणहि आहे आणि म्हणून लक्षणांतील सर्व अटी या लक्षणपद्यांत दिसून आल्या पाहिजेत हें स्पष्ट आहे. ह्या लक्षणपद्याच्या चार चरणांत चार अटी सांगितल्या आहेत त्या अशाः—(१) प्रारंभीं विषम चरणांत सहा व सम चरणांत आठ मात्रा असाव्या. (२) सम चरणांतील त्या मात्रा निरन्तर नसाव्या. (निरन्तर नसाव्या म्हणजे कशा नसाव्या याचें विवेचन पुढे व्हावयाचें आहे.) (३) ह्या सहा किंवा आठ मात्रांतील सम मात्रा पराश्रित नसावी म्हणजे ती पुढलीशीं मिळून गुरु अक्षर होऊं नये. अर्थात् दुसरी-तिसरी, चौथी-पांचवी व सहावी-सातवी मात्रा मिळून गुरु अक्षर झालेलें नसावें. तसेंच (४) चारी चरणांत या मात्रांपुढे रलग–रगण व पुढे लघु गुरु -निश्चितपणे असावें.

आपटे-कोशांत इंग्रजीमध्ये ह्या अटींचा अर्थ सांगितला आहे. ह्या चार अटींपैकीं १, ३ व ४ ह्या अटी प्रस्तुत लक्षणपद्यांत लागू पडणाऱ्या अशाच आहेत. दुसरी अट ही अशीच असली पाहिजे. म्हणजे तिचा अर्थ या लक्षण पद्यास लागू पडेल असाच असला पाहिजे. ही अट कोणती, समचरणांतील प्रारंभींच्या मात्रा निरन्तर नसाव्या म्हणजे कशा नसाव्या, हा प्रस्तुत विवेचनाचा विषय आहे. ह्या अटीस अनुसरून आपटे-कोशांत पुढीलप्रमाणे लिहिलें आहेः—The rules further require that the syllabic instants in the even quarter should not be all composed of short syllables or long syllables. म्हणजे सम चरणांतील पहिल्या आठ मात्रा केवळ लघु अक्षरांनी किंवा केवळ गुरु अक्षरांनी होतां कामा नयेत असें आपटे ह्यांच्या ह्या अर्थाप्रमाणे निष्पन्न होतें. पण वरील लक्षणपद्यांतील चौथ्या म्हणजे सम चरणांतील ह्या पहिल्या आठ मात्रा "वैतालीये" ह्या केवळ चार गुरु अक्षरांनीच बनलेल्या आहेत ! यांशीं आपटे यांनी केलेली अट सुसंगत होत नाही. आणि म्हणून नो निरन्तराः याचा त्यांनी केलेला अर्थ युक्त नाही असें म्हणावें लागतें.

पण आपटे ह्यांनी हा अर्थ कोणत्या तरी संस्कृत ग्रंथाच्या आधारेंच केला असेल. ह्या दृष्टीने पाहतां गंगादासकृत छंदोमंजरींत नो निरन्तराः यावर पुढील टीप आढळलीः— "समे पादे ताः कलाः नो निरन्तराः स्युः केवलं लघुरूपाः गुरुरूपा वा नस्युः किंतु लघुगुरु-मिश्रा इत्यर्थः" ही टीप आणि आपटे यांचा अर्थ समान आहेत. तथापि वैतालीये ह्या

केवळ गुरुरूप आठ मात्रांचाहि समावेश होत नसल्याने छंदोमंजरींतील ही टीपहि चिन्त्य होय असें म्हणणें प्राप्त होतें.

केदारभट्टाचे वृत्तरत्नाकरावरील श्री तारानाथ तर्कवाचस्पति भट्टाचार्यकृत विवृत्तींत "ताश्च षट् अष्टौ वा नो निरन्तराः निरन्तरलघुरूपा निरन्तरगुरुरूपा वा न भवन्ति" असें म्हटलें आहे! आपटे यांचे अर्थास या विवृत्तीचाहि आधार मिळत असला तरी-पण "वैतालीये" ह्यास तो लागू पडत नसल्यामुळे ग्राह्य म्हणतां येत नाही.

गणेशशास्त्री लेले यांचें मराठी साहित्यशास्त्र यांतहि असें म्हटलें आहे की "सम चरणांतील सोळा मात्रांपैकी पहिल्या आठ मात्रा लघु व गुरु अशा मिश्रित अक्षरांनीच पूर्ण केलेल्या असल्या पाहिजेत." ह्यावरून त्या केवळ गुरुरूप असूं नयेत असेंच स्पष्टपणें निष्पन्न होतें पण त्यांनी दिलेल्या वैतालीयाच्या उदाहरणांतच त्या केवळ गुरुरूप आहेत! लेले ह्यांनी दिलेलें वैतालीयाचें उदाहरण असें:—

ईशपदालागिं सर्वदा । आठविं चित्तामाजि सर्वदा ॥
मनुजा भजतां तया खरें । इष्टप्राप्ति क्षिप्र होय रे ॥

ह्या उदाहरणांतील चौथ्या चरणांतील पहिल्या आठ मात्रा केवळ गुरुरूप चार अक्षरांनी झालेल्या आहेत आणि त्या तशा असूं नयेत अशी तर अट वर दिली आहे ही विसंगति स्पष्ट आहे.

छंदोरचनेंत वैतालीयाचें उदाहरण प्राकृत सूत्रकृतांगांतील दिलें आहे. त्यांत चतुर्थचरण "नो कुज्झेनो माणि माइणे" असा आहे. यांतहि पहिल्या आठ मात्रा गुरुरूपच आहेत. अर्थात् अशा उदाहरणास लागू पडेल असाच लक्षणांतील नो निरन्तराः ह्या अटीचा अर्थ असला पाहिजे हें उघड आहे आणि म्हणूनच आपटे, लेले, छंदोमंजरींतील टीप व वृत्तरत्नाकर-विवृत्ति यांची एकवाक्यता असली तरी ती ग्राह्य ठरत नाही.

वैद्य ह्यांच्या संस्कृत इंग्रजी कोशांत मात्र "the syllabic instants in the even verse must not be all composed of short syllables" म्हणजे समचरणांतील पहिल्या आठ मात्रा केवळ लघुरूप असूं नयेत एवढेंच सांगितलें आहे. त्या गुरुरूपहि नसाव्या असें कांही आपट्यांप्रमाणे सांगितलें नाही व म्हणून वैद्य यांनी केलेला हा अर्थ लक्षणपद्याशीं व अन्य उदाहरणाशीं विसंगत होत नाही.

छंदःशास्त्राचा मूलाधार म्हणजे पिंगलाचीं सूत्रें. प्रस्तुत विषयासंबंधाचें पिंगलाचें सूत्र "षट् चामिश्रा युजि" असें आहे. या सूत्रांत पिंगलाने युजि म्हणजे सम चरणांत अमिश्र म्हणजे केवळ लघुरूप अशा फार तर सहा मात्रा असतात असें स्वच्छ सांगितलें आहे. अर्थात् आठहि मात्रा अमिश्र म्हणजे केवळ लघुरूप नसाव्या, एवढीच अट पिंगलसूत्रांत आहे. त्या केवळ दीर्घ अक्षरांनी होऊं नयेत अशी कांही तेथे अट नाही. पिंगलसूत्राप्रमाणे सहा लघु येऊं शकतात. तेहि क्रमाने सहा येत नाहीत, असें स्पष्टीकरण हेमचंद्राने छंदोनुशासनांत केलें आहे. त्याने तेथे ह्या आठ मात्रा निरनिराळ्या तेरा प्रकारांनी कशा येऊं शकतात हें प्रत्यक्ष लघुगुरूंचीं चिन्हें योजून दाखविलें आहे. त्यांत चार गुरूंचा समावेश आहेच. हें पाहिल्यावर कांही शंका उरत नाही. पिंगलाच्या अमिश्र ह्या शब्दाच्या जागीं वृत्तरत्नाकरांत निरन्तर हा शब्द योजिला आहे म्हणून नो निरन्तराः

याचा अर्थ निरन्तराः अंतररहिताः अव्यवधानेन लघुरूपा एव अखिला न भवेयुः असाच करणें युक्त होय.

सह्याद्रीच्या आगस्ट १९४७ च्या अंकांत श्री. खाजगीवाले यांनी वैतालीयाचें लक्षण केलें आहे त्यांत अतिव्याप्ति व अव्याप्ति दोन्ही दोष आहेत. कारण त्या लक्षणाप्रमाणे विषम चरणांत सहा मात्रांपुढे र गणाऐवजीं न गणहि येतो, तसेंच सम चरणांतील पहिल्या आठ मात्रा केवळ लघुरूप किंवा त्यांपैकी ३ ते ८ सहा मात्रा 'संततलघु' येऊं शकतात, पण पिंगल-हेमचंद्रांच्या लक्षणाप्रमाणे त्या तशा चालत नाहीत, म्हणून या लक्षणांत अतिव्याप्ति होते. तसेंच हेमचंद्राने दिलेल्या तेरा प्रकारांपैकी ।। ।। ऽ ऽ, ऽ ।। ऽ ऽ, ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ ।। ऽ आणि ऽ ।। ।। ऽ ह्या पांच प्रकारांचा समावेश श्री. खासगीवालेकृत लक्षणांत होत नसल्यामुळे तें अव्यापकहि आहे. पिंगल-हेमचंद्रादि शास्त्रकारांचें वैतालीयाचें लक्षण थोडक्यांत पुढील-प्रमाणे सांगतां येईल.

वैतालीय विषम चरण = तीन दगण + रलग.

,, सम ,, = संतत सहा लघु नसलेले चार दगण + रलग.

(दगण = द्विमात्रक गण. हा दोन लघूंचा किंवा एका गुरूचा असा द्विविध संभवतो.)

अलं अतिविस्तरेण.

---

## संपादकीय

'वर्ल्ड प्रेस' ( World Press ) ह्या स्कँडिनेव्हियन त्रैमासिक नियतकालिकाचे हिंदुस्थानांतील प्रतिनिधि श्री. राम एल्. गोगटे ह्यांचेकडून एक पत्र आलें असून त्याचा आशय पुढीलप्रमाणे आहे.

'वर्ल्ड प्रेस' ह्या नियतकालिकांत ( निरनिराळ्या भारतीय भाषांप्रमाणे ) मराठींतील प्रातिनिधिक लघुकथांचें भाषांतर देण्याचा चालकांचा मानस आहे. लघुकथा पूर्वप्रकाशित असल्या तरी चालतील. पण निवडीचा एक निकष हा राहील की त्या कथांत भारतीय संस्कृतीचें प्रतिबिंब असावें. अशा निवडक लघुकथा श्री. गोगटे ह्यांच्याकडे पाठविल्या जाव्यात. ते त्यांचें इंग्रजींत भाषांतर करून त्या नियतकालिकाच्या संपादकाकडे धाडतील. मग तिथे इंग्रजीवरून त्यांचें स्कँडिनॅव्हियन भाषेंत रूपान्तर होईल. अशा रीतीने त्या नियतकालिकांत आलेल्या प्रत्येक कथेबद्दल लेखकाला मोबदला म्हणून पंचवीस डॉलर्स मिळतील. दोन रूपान्तरांसाठी कांही खर्च येईलच, तो लक्षांत घेतां, लेखकाला मिळणारा हा मोबदला सढळच वाटेल.

मराठी लघुकथांचे निर्माते व कैवारी ह्या संधीचें जबाबदारीने स्वागत करतील अशी उमेद आहे. श्री. गोगटे ह्यांचा पत्ता येणें-प्रमाणे:—

'किताबमहाल',
१९० हॉर्नबी रोड, फोर्ट,
मुंबई-१.

एक शंका

# ज्ञानेश्वर, ज्ञानेश्वरी आणि प्रा॰ फाटक

लेखक :
प्रा. गं. भा. निरंतर.

प्रा. न. र. फाटक यांनी ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी यासंबंधी लिहिलेले लेख ग्रंथरूपाने प्रसिद्ध झाले आहेत. त्यांच्यासारख्या चिकित्सकांकडून या विषयाविषयी लेखन व्हावें हा मोठा योग आहे. प्रा. फाटक यांच्या लेखनाचा वा भाषणाचा दुसरा एक फायदा होतो. ते विशेषतः संतकालीन वाङ्मयाविषयी आणि तत्कालीन सामाजिक जीवनाविषयी ज्या ज्या वेळीं कांही लिहितात वा बोलतात त्या त्या वेळीं कांही तरी एकदम नवीन असें वाचावयास वा ऐकावयास मिळतें. आणि अभ्यासकांना कांही नव्या दृष्टिकोनाचाहि लाभ होतो.

ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी या विषयासंबंधी आता कांही नवीन सांगावयाचें राहिलें नसावें असा अंदाज होता तोंच प्रा॰ फाटक यांचा वरील ग्रंथ वाचला. अपेक्षेप्रमाणे त्यांत एकदम नवीन असें कांही आढळलें. त्यासंबंधी कांही शंका उत्पन्न झाल्या त्याच येथे नमूद करीत आहें. आसपास तपास करतां अनेकांना अशीच शंका उत्पन्न झाल्यासारखें दिसलें. प्रा॰ फाटक यांच्याशीं व्यक्तिशः यासंबंधी थोडी चर्चाहि केली. सर्वांच्या सोयीसाठी मी शंका प्रकटपणें विचारीत आहें. म्हणजे त्यांनी केलेल्या निरासाचाहि सर्वांना फायदा होईल.

वरील ग्रंथांत ज्ञानेश्वरीकडे पाहण्याचा अगदी नवा दृष्टिकोन मांडला आहे. ज्ञानेश्वरी लिहितांना यावनी सत्तेमुळे ओढवणाऱ्या धार्मिक आक्रमणास पायबंद घालण्याचा मार्ग सांगावा असा हेतु ज्ञानेश्वरांच्या मनांत होता असें प्रा॰ फाटक यांना सांगावयाचें आहे. हें मत अगदी नवीन आहे. कारण यापूर्वी ज्ञानेश्वरीच्या सर्व टीकाकारांनी असें कांही ज्ञानेश्वरांच्या मनांत असल्याचें कोठे सांगितलेलें आढळलें नाही, उलट स्वतः ज्ञानेश्वरांनी आणि ज्ञानेश्वरांच्या अभ्यासकांनी ज्ञानेश्वरकाळीं सर्वत्र स्वराज्याचा आनंदीआनंद असल्याचें सांगितलें आहे. परमेश्वरप्राप्तीचा सुलभ मार्ग दाखविणें हीच ज्ञानेश्वरांची खरी कामगिरी होय असें सर्वश्रुत मत आहे. त्याचा विस्तार करण्याची जरूरी नाही.

प्रा॰ फाटक यांनी आपलें मत मांडतांना आधार दिले आहेत. ते आधार नमूद करण्यापूर्वी हें मत प्रा. फाटकांनी ज्या शब्दांत व्यक्त केलें आहे ते शब्द उद्धृत करतों. "त्या काळीं देव आणि धर्म हे दोन तत्कालीन समाजाचे जिव्हाळ्याचे विषय मुसलमानांच्या आक्रमणामुळे कमालीच्या संकटांत होते (पृ. २), (मुसलमानांच्या) पूर्वीच्या प्रत्येक धाडीनें कांहीना कांही अनिष्ट परिणाम मागे ठेविले होते. इस्लामच्या आघातापुढे येथील समाजाची श्रुतिस्मृतिपुराणोक्त व्यवस्था कोसळूं लागावी यांत नवल नाही. या वेळीं राजाकडून देवधर्मानिमित्त संरक्षण मिळण्याची आशा जनतेला वाटणें शक्य नव्हतें ( पृ. ३ ), इस्लामच्या धडाक्याने ही स्थिति (देव, धर्म, निर्भय असण्याची) पालटली; हिंदुसमाजाला या नव्या धर्मांच्या तडाख्यांतून वांचवावयाचें असल्यास त्या धर्मांचें वळण येथील भक्तिमार्गाला देणें हीच एक

तोंड होती. ( तें वळण म्हणजे अतिशय साधा भक्तिमार्ग व थोडे आणि सुकर आचार हें इस्लामचें वळण असें प्रा. फाटक यांनी सांगितलें आहे) (पृ. ४), तीर्थक्षेत्रें इस्लामच्या धुमाकुळांत नष्ट झालीं. मंदिरें भंगलीं . विद्वानांचा वर्ग देशोधडीला लागला अशा स्थितींत देवधर्माच्या निमित्ताने जनतेने पाहायचें कुणाकडे ही असहायतेची निराशा घालविण्यासाठी ज्ञानेश्वरांनी गीतेचा आश्रय केला (पृ. ६), ज्ञानेश्वराच्या काळीं देव आणि धर्म धोक्यांत टाकलेला होता (पृ. ७).

ज्ञानेश्वरकालीन स्वराज्याविषयी प्रा. फाटक म्हणतात:—

"त्या काळांत सुखाची चंगळ होती, स्वराज्य होतें, वगैरे कल्पना उराशीं बाळगून ज्ञानेश्वराबद्दल काढले जाणारे निष्कर्ष कांहीसे अज्ञानाचेच समजावे लागतात (पृ. ७)."

महादेवराव व रामदेवराव या दोनच राजांचा वृत्तान्त पाहिला तर काय दिसतें ?

प्रा. फाटक म्हणतात, "कसाईखान्यांत आपले भाउबंद कापले जात असतांना बाहेर एखादा बोकड शेळयांच्या परिवारांत बेदरकारपणें खेळत असतो. थोड्या वेळानंतर आपल्याहि गळ्यावरून सुरी फिरावयाची आहे याचें तो भान बाळगीत नाही—या बोकडासारखीच मुसल-मानांनी आक्रमण केलें त्या वेळीं आपल्या रंगढंगांत रमणाऱ्या हिंदु राजांची स्थिति दिसते." (पृ. १०६)

ही वस्तुस्थिति पाहून महाराष्ट्राला राज्य, ग्रंथ, विशिष्ट देव किंवा एखाद्या महा-पुरुषाची शिकवण यांच्या आश्रयाची आशा न धरतां स्वतःकडे पाहण्याला स्वतःच्या ठिकाणचीं सुप्त सामर्थ्यें जाणण्याला ज्ञानेश्वरांनी शिकविलें (पृ.१०७-१०८).

ज्ञानेश्वरांच्या मनांत वरील आक्रमणाचे विचार होते आणि त्यांतून टिकाव धरण्याची शिकवण देण्याचा हेतु होता यांस कांही वचनें आधार म्हणून प्रा. फाटक यांनी दिलीं आहेत.

पृ. ७ वर—

कळिकळित भूतां । आला देखोनि निरुता ।
म्हणून कळी गिळितया जीवां । सर्व प्रकारीं धावा ।
करी पा वेगीं ॥

असें गहिनीनाथांनी निवृत्तिनाथांना सांगितलें. त्यांनी ( निवृत्तिनाथांनी ) ही कामगिरी ज्ञानदेवांना सांगितली. ज्ञानदेवांनी मग ग्रंथरचना केली.

'कलीनें ग्रासला' याचा अर्थ ज्ञानेश्वरकालीन परिस्थितीकडे लक्ष देऊनच लाविला पाहिजे. असें प्रा. फाटक म्हणतात.

भूतां परस्परें, पडो । मैत्र जिवाचें ।
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो.

हे समारोपांतील ज्ञानेश्वरांचे उद्गारहि ज्ञानेश्वरकालीन परिस्थितीचे निदर्शक आहेत. ज्ञानेश्वरींतील अ. ३ ओवी ९८-९९

तुम्ही जें करूं म्हणाल । तें अपैसें सिद्धी जाईल । वांछितही पुरेल, मानसींचें (९८)
वाचासिद्धी पावाल । आज्ञापक होआल । म्हणियें तुमतें मागतील महाऋद्धि (९९)

यांतील आज्ञापक होआल याचा अर्थ स्वतंत्र व्हाल, दुसऱ्यावर हुकुमत गाजविण्याची योग्यता तुम्ही प्राप्त करून घ्याल असा तत्कालीन परिस्थितिवाचक घेतला पाहिजे असें प्रा. फाटक म्हणतात (पृ. २६).

तसेंच, निजवृत्ती जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे । या ओवीचा अर्थ 'स्वत्व सुटलें कीं स्वातंत्र्य जातें.' स्वातंत्र्य म्हणजे राजकीय स्वातंत्र्य असा घ्यावा असें प्रा. फाटक म्हणतात (पृ. २७).

ज्ञानेश्वरींतील अशा वचनांचा असा अर्थ सुचविण्याचा प्रा. फाटक यांचा हेतु ज्ञानेश्वरांच्या मनांत इस्लामी राजकीय आक्रमणाचें संकट होतें हें सिद्ध करावयाचें हा आहे.

ज्ञानेश्वरकाळीं इस्लामी राज्य दक्षिणेंत कायमचें (?) उतरलें नव्हतें असें प्रा. फाटकहि म्हणतात (पृ. ३६).

मग ज्ञानेश्वरास त्या आक्रमणाची जाणीव कशी झाली ? प्रा. फाटक म्हणतात. 'मुसलमानांचा पाशवी कारभार दक्षिणेकडे ऐकून सुद्धा ठाऊक नव्हता असें मानणें धोक्याचें ठरतें.' यास पुरावा म्हणून ज्ञानेश्वरींतील म्लेच्छ शब्दाचा आधार दिला आहे.

अ. १८–श्लोक २२ मध्ये गीतेंत तामस ज्ञानाचीं लक्षणें सांगितलीं आहेत. तीं विशद करतांना ज्ञानेश्वर म्हणतात, येरीही शास्त्रबाह्यात्कारीं । जे निंदेचे विटाळ वरी । वोळविलेंसें डोंगरी । म्लेच्छ धर्माच्या (१८–५५०)

यानंतर ओवी ५५८ ते ५६३ या म्लेच्छ धर्मावर जास्त प्रकाश टाकणाऱ्या आहेत. तत्कालिक इतिहासाचा आधार पाहिल्यास म्लेच्छ म्हणजे कोण असावे याचें कांहींसें बिनचूक ज्ञान करून देणारीं आहेत (पृ. ३७).

इस्लामच्या आक्रमणाचा हा विचार केवळ ऐकीव माहितीवरून ज्ञानेश्वरांच्या मनांत आला असावा असें म्हणणें तितकेंसें पक्कें ठरणार नाही असा ग्रंथ पुरा होत असतां प्रा० फाटक यांना वाटलें असावें म्हणून ज्ञानेश्वरांनी तें आक्रमण प्रत्यक्ष पाहिलें असावें असें प्रा. फाटक यांनी म्हटलें आहे.

हें प्रत्यक्ष दर्शन ज्ञानेश्वरांना केव्हा होणें संभवनीय आहे ? अर्थात् तीर्थयात्राप्रसंगीं. म्हणजे ज्ञानेश्वरी लेखनापूर्वी तीर्थयात्रा केली असें ठरलें पाहिजे, तरच हें सुसंगत ठरेल. यासंबंधी सिद्ध कालनिर्देश असे आहेत.

ज्ञानेश्वरांचा जन्म शके ११९७
शुद्धिपत्र शके १२०९
ज्ञानेश्वरी लेखन शके १२१२
तीर्थयात्रा शके १२१५ ते १२१७
समाधि शके १२१८

या कालनिर्णयांवरून ज्ञानेश्वरांनी वयाच्या १५ व्या वर्षी ज्ञानेश्वरी लिहिली हें स्पष्ट आहे. अर्थात् त्यापूर्वी म्हणजे ज्ञानेश्वरीलेखनापूर्वी तीर्थयात्रा केली तर ती शुद्धिपत्रानंतर नामदेवासह शके १२०९ ते १२१२ च्या दरम्यान वयाच्या १२ ते १५ वर्षांच्या काळांत केली असें ठरेल. परंतु वरील अनुक्रम बदलतां येत नाहीत ही खरी अडचण आहे. ज्ञानेश्वरीलेखनानंतर नामदेवासह तीर्थयात्रा केली हें फिरवितां येत नाही. पण प्रा० फाटक यांना हें जास्त अनुकूल आहे म्हणून ते म्हणतात :

"तीर्थयात्रा आटोपल्यावर त्यांनी गीता टीका रचिली कीं तिची रचना करून ते तीर्थ-

यात्रेस गेले याचा स्पष्ट व निश्चित खुलासा उपलब्ध नाही. परंतु नंतर त्यांनी गीतेची टीका लिहिली असणें जास्त संभाव्य व सयुक्तिक वाटतें" ( पृ. १०७ ).

या विधानांत आजपर्यंत यासंबंधी केलेले कालनिर्णय प्रा० फाटक यांनी एकदम असिद्ध ठरविले आहेत. ते ' अस्पष्ट ' आणि ' अनिश्चित ' कसे ठरतात याचें विवेचन करणें जरूर नाही का? तीर्थयात्रेचा कालनिर्णय केवळ संभाव्य व सयुक्तिक वाटण्यावरच ग्राह्य मानावयाचा काय?

तीर्थयात्रेच्या कालनिर्णयाचा हा अभिप्राय ग्रंथाच्या शेवटीं शेवटीं अगदी ओझरता नमूद झाला आहे. परंतु तसें ठरलें तर ज्ञानेश्वरीलेखनांतील हेतूचें ग्रंथांतील विवेचन निदान कांही अंशीं तरी संभाव्य वा सयुक्तिक ठरेल, नाहीतर ' कलि ' ' भूतमात्रांवें मैत्री, ' आक्रमक व्हाल, ' ' स्वतंत्रता ' ' म्लेच्छ ' इत्यादि शब्दांचा अर्थ यवनाक्रमणाच्या संदर्भाने लावण्याचा ' प्रपंच ' मतपरिवर्तनास पुरेसा ठरणार नाही.

म्हणून शंका अशी की प्रा० फाटक यांनी नवें मत मांडण्याच्या वेळीं पूर्वी सर्वमान्य झालेल्या मतांची व आधारांची चिकित्सा करावी, त्यांचें निराकरण करावें, म्हणजे त्यांच्या ज्ञानाचा अभ्यासकांस लाभ घेतां येईल.

---

## बहुरंगी करमणूक

( भाग पहिला )

संग्राहक—रा. त्र्यं. रानडे

प्रकाशक— मंगल साहित्य प्रकाशन, आनंद चेंबर्स, अंबराई, पुणें ४

किं. सव्वा रुपया

विद्यार्थ्यांची ( आणि प्रौढांची सुद्धा ) करमणूक करून देणाऱ्या ह्या पुस्तकांत, बुद्धीला चालना देणारीं कोडीं, चमत्कृति वगैरेंचा समावेश केला आहे.

## जाळत्या ठिणग्या

ले०—ब. मो. पुरंदरे

प्र०—सौ. सीताबाई करंदीकर ३९९/१ सदाशिव, पुणें २

किं. एक रुपया

शालेय इतिहासपुस्तकांत ज्या गोष्टींचा समावेश होण्याची संभवनीयता कमी अशा ऐतिहासिक गोष्टी व व्यक्ति ह्या पुस्तकांत दिल्या आहेत. बाजी जेधे, कान्होजी जेधे, फिरंगोजी नरसाळा, बाळाजी आवजी, महाराज, प्रतापराव गुजर, नागोजी जेधे, नावजी बलकवडे व पिऱ्या बेरड इतक्यांचें शौर्य व चारित्र्य इथे पाहायला मिळतें.

# अणुगर्भीय परिभाषा*

ले० प्रा. सखाराम विनायक आपटे

१७. Fission द्वेधाक्रिया, द्वेधा. औस्रातु–रदातु (विशेषतः रदातु) यांमध्यें अणुगर्भ फुटून जाण्याची क्रिया जी स्वभावतः चालू असत्ये ती रदाक्रिया. कृत्रिमरीत्या म्हणजे हेलुकादि शरांचा मारा करून अणुगर्भ छिलला जातो तेव्हां ती 'विशरणक्रिया' (वि–शॄ). 'द्वेधा' हा विशरण-क्रियेचाच एक विशेष प्रकार आहे. याचा उपलम्भ (discovery) १९३८ सालीं हान आणि स्ट्रासमान यांना झाला. द्वेधाक्रियेचें वर्णन ठोकळपणें असें आहे. द्वेधाप्रवण अणुगर्भावर वस्तुकाचा आघात होतांच त्याचा प्रचास होतो. मग त्या अणुगर्भाला एकप्रकारें ज्वर येतो म्हणा किंवा मळमळ उत्पन्न होत्ये म्हणा; पण त्यांतून लगेच किंवा क्वचित् थोड्या विलंबानें जवळ जवळ निम्म्या अणुभाराचे दोन अणु बाहेर फुटून निघतात. या छकलांच्या फुटून निघण्याबरोबरच तेजोद्गार खूप मोठा होतो आणि शिवाय कांहीं वस्तुक मोकळे होऊन बाहेर भिरकावले जातात. अणूची उकल किंवा द्वेधा जेथें होत्ये, तेथें तडा जातो आणि तेथून दोहींकडे अत्यन्त वेगानें दोन शकलें आणि कित्येक वस्तुक हे उडविले जातात. या निष्पन्नांपैकीं वस्तुक असे असतात कीं त्यांवर उच्चय मुळींच नाहीं; या कारणानें, आणि त्या शकलांच्या मानानें ते हलके असतात याही कारणानें, त्यांचा संचार खूप मोकाटपणें आजूबाजूच्या द्रव्यांमधून इतस्ततः होऊं शकतो; पण शकलांचें मात्र तसें नाहीं. आजूबाजूच्या अणूंशी होणाऱ्या धकाधकींत त्यांचा वेग जो प्रथम विशेषच असतो तो लवकरच नाहींसा होऊन जातो.

सध्यां माहित असलेल्या मौलांमध्यें औस्रातु (९२), प्रैजातु (९१) आणि क्षपातु (९०) एवढ्यांचीच अशी द्वेधा होत्ये असें दिसतें.

१८. Gamma rays गामुक शर किंवा किरण. अत्यन्त भिदुर असे हे तेजोरज (किंवा महाक्षिप्रतेचे तरंग म्हणा) कांहीं कांहीं रादनिक द्रव्यांतून बाहेर पडत असतात. पारायणी किरणांच्यापेक्षांही याची क्षिप्रता अधिक असत्ये. पारायणी किरणांचा जन्म अणुगर्भाच्या नजीकच्या बीजकांमधूनच होतो; परंतु गामुक किरण मात्र अगदीं थेट अणुगर्भांतूनच निघत असतात.

१९. Heavy hydrogen गुरूज्ज [deuterium पहा].

२०. Heavy water गुरूदक. या प्रकारच्या पाण्यांतील (उदकांतील) बहुतेक किंवा सर्वच उज्ज गुरूज्ज या जातीचा असतो. सामान्य पाण्यांत (उदकांत) फक्त पांच हजारांत एक एवढ्या अत्यल्प प्रमाणांतच गुरूज्ज जातीचा उज्ज असतो. सामान्य उदकापासून गुरूदक पृथक् करून काढणें ही एक अत्यंत खर्चाची प्रक्रिया असून तींत उदकाचें विच्छेदन (म्ह० बीजवहाळीच्या योगानें केलेलें छेदन) हें प्रधान अंग असतें. उदकरेणूच्या भाराचा बहुतांश ऊर्जाणूच्यामुळेंच असल्याकारणानें गुरूदक आणि सामान्य उदक यांच्या रेणुभारांत फरक फारसा पडत नाहीं; तो २० स १८ एवढाच काय तो पडतो. तसेंच

* मागील अंकांतील टीपा आणि तळटीपा इत्यादींचा उपयोग करावा.

गुरूजाचा रेणु आणि सामान्य उदकाचा रेणु यांत आकारतः म्हणण्यासारखा फरक नसल्यामुळें गुरूदकाची घनतासुद्धां सामान्योदकाच्या घनतेपेक्षां १० टक्केच काय ती अधिक भरते. औस्र-पुंजराशिकेच्या कांहीं विशेष प्रकारामध्यें मन्दायक म्हणून गुरूदकाचा उपयोग होतो.

२१. Ionization विदलन. ही एक अशी क्रिया आहे कीं जिच्यामुळें एरव्हीं अनुचयी असलेला अणु सोचय होतो. उदाहरणार्थ वैजिक विसर्ग नलिकांमध्यें वैजिक विसर्गाच्या योगानें असें होतें कीं त्यांतील कित्येक अणूंच्या भ्रमरवीजकांपैकीं एक किंवा दोन बाह्यवीजक सहज उडविले जातात. त्यांच्या वियोगामुळें राहिलेला अणु अर्थात् धनोचयी बनतो. असें विदलन कित्येक अन्य प्रसंगांनींही घडून येतें. उ० अणूवर पारायणी किरणांच्या आघातानें. विदलन झालेल्या अणूला दल अशी संज्ञा आहे.

२२. Isotope तत्रस्थ.[1] रासायनिक आचरणाच्या दृष्टीनें एकच मौल; परंतु त्याच्या निरनिराळ्या जाती असूं शकतात. हा निरनिराळेपणा अणुभारांत येतो, अणु क्र मात्र तोच असतो — हीच गोष्ट एकाच मौलाच्या या निरनिराळ्या जाति होत या गोष्टीची निदर्शक आहे. बहुतेक सर्वच मौलांचें असें आहे कीं तो मौल अनेक तत्रस्थांचें मिश्रण या स्वरूपांतच आढळतो. अणुभारांत पाहिलें तर भिन्नता, रासायनिक धर्मांत पाहिलें तर ऐक्य; असें विवक्षित मौलाच्या तत्रस्थांचें वर्णन करतां येतें. हरातु (क्लोरिन, वर्णहर) उदाहरणार्थ घेतला तर त्यांत दोन प्रकारच्या अणूंचे मिश्रण आहे असें दिसून येतें–एकाचा अणुभार ३५ आणि दुसऱ्याचा ३७. रासायनिक अणुभारांच्या कोष्टकांत हरातूचा अणुभार ३५·४६ असा दिलेला आढळेल; याचें कारण असें कीं साधारणतः हरातूच्या ३७ वाल्या एका अणूला ३५ वाले अणू चार आढळतात. यामुळें हरातुचा सरासरीनें अणुभार (रासायनिक रीत्या) ३५·४६ असा येतो. निसर्गोपलब्ध औस्रातूचें असेंच आहे. त्यात तीन जातींच्या अणूंचें मिश्रण असतें; पण त्यांतल्या त्यात औस्र २३४ या जातीचे अणू अत्यंत थोडे असतात. दुसरे दोन प्रकार म्हणजे औस्र २३५ आणि औस्र २३८ हे मात्र फार महत्त्वाचे असून त्यांचें प्रमाण १ : १४० असें पडतें. औ २३५ ही जी लिहिण्याची पद्धत आहे तिच्यांत औ हें औस्रातु या मौलाचें रासायनिक चिन्ह होय; आणि त्याच्यापुढील आकड्यानें हा अणु २३५ अणुभारवाला आहे असें दर्शविलें जातें.

२३. Mass-energy equivalence अद्वैतं वस्तु तेजसोः । एकाद्या पदार्थांतून तेज बाहेर पडत असलें म्हणजे त्याचें वस्तुमानही त्या मानानें नष्ट होत असतें. वस्तूचें तेजांत परिभावन होतें असें म्हणावयाचें. या संबंधांत आइनस्टाइनचें समीकरण प्रसिद्ध आहे; त्यावरून पाहतां, १ महाग्राम ( १ किलोग्राम ) वस्तूचे पूर्णपणें तेजांत परिभावन झाल्यास २५ अब्ज सओता ( सहस्रओज तास Kilowatt hours ) इतकें तेज ( किंवा शक्ति ) उत्पन्न झाली पाहिजे.

२४. Mass number वस्तुताङ्क. वस्तुता mass, स्थूलपणें अणुभारांक म्हणून जो वर वर्णिलेला आहे तोच हा वस्तुतांक. याचा घोटाळा अणुक्र (=अणुक्रमांक ) याच्याशीं होऊं देऊं नये.

---

१. तत्रस्थ = त्याच घरांत राहणारे, तोच क्र असणारे, त्याच रासायनिक धर्मानें युक्त. रासायनिक मौलावर्त कोष्टक (periodic table) पहा.

२५. Moderator मंदायक. द्वेधाक्रियेतून जेव्हां वस्तुक निर्माण होतात तेव्हां ते वेगस्वी असतात. पुञ्जराशिकेमध्यें जेव्हां या वस्तुकांचा उपयोग करून घ्यावयाचा असतो तेव्हां त्यांना वेगानें पुष्कळच कमी करून घेणें आवश्यक असतें. या हेतूनें म्हं० वस्तुकांचा वेग कमी करून टाकण्याच्या हेतूनें या कामीं ज्या द्रव्याचा उपयोग करतात त्याला मन्दायक म्हणतात. मंदायकाच्या अणूमध्यें जे विशेष गुण आवश्यक असतात ते असे. त्यांनीं वस्तुकांचा ग्रास करतां कामा नये; वस्तुकांच्या आघातानें त्यांच्या शक्तीचा बराचसा अंश चटकन् मन्दायकाच्या अणुगर्भानें उचलला पाहिजे; म्हणजे तितक्या मानानें वस्तुक, जो बाजूला फेकला जातो तो, पुष्कळ कमी वेग होऊन गेला पाहिजे. या कारणाकरितां मन्दायकाचा अणुभारही बेताचाच म्हणजे लहानच असला पाहिजे. गुरुजल याकामीं उपयोगी पडतो; पण सामान्य उज्जाणु उपयोगी पडत नाहीं कारण तो प्राय: वस्तुकच्या वस्तुकच गडप करतो असें आढळतें. टंकाणूचा स्वभावही पुष्कळसा असाच आहे; तस्मात् तोही मन्दायक म्हणून उपयोगी पडत नाहीं. लिखायत graphite या द्रव्याचा फार चांगला उपयोग मन्दायक म्हणून होतो; मात्र त्यांत परकीय द्रव्यें राहूं देतां कामा नये; तो अगदीं शुद्धतम करून घ्यावा लागतो. याप्रमाणें एकंदरींत गुरुजाचा अणु आणि अर्यातूचा अणु हे चांगले मन्दायक ठरतात.

२६. Neptunium सुवेरातु. Plutonium कुवेरातु. या रासायनिक मौलांचे अणुक ९३ आणि ९४ असून हे निसर्गोपलब्ध नाहींत. यांची संप्राप्ति औस्रातूच्या पुञ्जराशिकेमध्यें होते. औ२३८या अणूनें वस्तुकाचा ग्रास केला म्हणजे औ २३९ हें अस्थायी आणि रादनिक द्रव्य बनतें. त्यांतून व अल्पक बाहेर पडल्यानें ९३ सु २३९ हा तयार होतो. पण हाही रादनिकच असतो आणि त्यांतून आणखी एक व अल्पक बाहेर पडला कीं ९४ कु २३९ (कुवेरातु) निष्पन्न होतो. कुवेरातु हें द्रव्य अत्यंत द्वेधोपयोगी असल्यानें त्याच्या निष्पत्तीकरिताच हॅनफोर्ड वॉशिंग्टन येथें एक मोठी थोरली भट्टी किंवा कारखाना युद्धकालीं उभारला गेला; आणि त्यांतून निर्माण झालेलें कुवेरातु हें द्रव्य अणुध्वंमध्यें वापरलें गेलें.

२७. Neutron वस्तुक. उच्चयरहित अल्पक. उच्चय म्हणजे वीजोच्चय. वस्तुकाची वस्तुता आणि धानकाची वस्तुता अगदीं एकच म्हणावयास हरकत नाहीं; धानकाला धनोच्चय एक असतो, वस्तुकाला धनोच्चयही नाहीं आणि ऋणोच्चयही नाहीं. निसर्गांत नुसता सुटा वस्तुक कधीं आढळत नाहीं. त्याची निःयस्थिति म्हटली म्हणजे धानकांच्या समवेत अणुगर्भामध्यें बांधलेले असणें ही होय. परंतु आता अण्वन्तक अथवा अणुच्छेदी साधनें निघालीं आहेत; त्यांच्या योगानें वस्तुकाला अणुगर्भांतून हुसकून काढतां येते. एकाद्या विवक्षित अणुगर्भामध्यें वस्तुक किती तें त्या अणुगर्भाच्या मांडणींत दर्शविलेलें असतें तें असें. हेलाणुगर्भ $_2$ हे $^4$ अशा रीतीनें मांडून दाखवितां येतो. या मांडणींत डावीकडील खालचा आंकडा 'अणुगर्भांत धानक किती' हें दाखवितो आणि उजवीकडील वरचा आंकडा 'अणुगर्भाची एकंदर वस्तुता किती लव' हें दाखवितो. अर्थात् $_2$ हे $^4$ याचा अर्थ असा कीं हेलाणुगर्भाम यें एकंदर वस्तुता ४ लव इतकी असते; पैकीं अन्तःस्थ दोन धानकांची वस्तुता २ लव; आणि बाकी राहिलेली वस्तुता २ लव असे येत असल्यामुळें हेलाणुगर्भामध्यें वस्तुक २ असले पाहिजेत असें समजावयाचें. हेलाणुगर्भ दोन धानक आणि दोन वस्तुक यांचा बनलेला असून त्याचा उच्चय ' धन दोन '; इतका अर्थ त्या मांडणींत आहे.

वस्तुकाची उपलब्धि चॅड्विक याला १९३२ सालीं झाली. विदूरातूवर हेलुकांचा मारा करण्यापासून त्याला वस्तुक मोकळ्या स्थितींत मिळूं शकले; त्यानें रदातूच्या अणुगर्भांतून

निघणाऱ्या हेलुकांचा अस्त्र म्हणून या प्रयोगांत उपयोग केला. विशेष वेगस्वी वस्तुक नको असतील तर अजूनसुद्धां हीच वस्तुक-संपादनाची पद्धत उपयुक्त आहे. अणुशक्ति अथवा आणवीयशक्ति संपादन करण्याच्या कामीं वस्तुकांचें अत्यन्त महत्त्व आहे. कारण कीं त्यांच्या आघातोत्तर प्रघासानें औस्राणूची द्वेधा घडून येत्ये; आणि या द्वेधाक्रियेचा विशेष; एकतर तेजोद्गार सपाटून होतो आणि दुसरा विशेष म्हणजे द्वेधाक्रियेला लागणारे वस्तुक द्वेधाक्रियेतूनच निष्पन्न होतात! अर्थात् या गोष्टीमुळें सानुबन्ध क्रिया साधत्ये.

वस्तुक हे अनुच्चयी असल्यामुळें अणुगर्भांच्या अन्तराळातून ते फारच मोकळेपणें संचार करूं शकतात. स्थाणु[1] पदार्थांच्या अन्तरंगातून यांचें हिंडणें फिरणें अगदीं सहज आणि बिनाविरोध होऊं शकतें. तथापि त्यांच्या हिंडण्याफिरण्यांत त्यांची अणुगर्भांशीच खुद्द गांठ पडल्यास ते धुत्कारून दिले जातात. त्याला अपस्किरण म्हणतात. क्वचित् क्वचित् ते अणुगर्भांत गडप केले जातात—आणि अशा रीतीनें अणुगर्भानें वस्तुक गिळल्यास तो अणुगर्भ बहुधा रदक्रिया-संपन्न होतो. वस्तुकाचा अशा रीतीनें प्रघास करतां येणें ही गोष्ट निरनिराळ्या मौलांच्या अणूंना निरनिराळ्या प्रमाणांत साधत्ये आणि या बाबतींत त्या आघाती वस्तुकाच्या वेगावरही पुष्कळ अवलंबून राहतें. कांहीं द्रव्यें अशीं आहेत कीं त्यांतून वस्तुक आरपार सहज जाऊं शकतात. कांहीं अशीं आहेत कीं त्यांच्या अन्तरंगांत वस्तुक अडकून पडतात. परंतु असें एकही द्रव्य सांगतां येत नाहीं कीं ज्याच्या अंगीं वस्तुकांना एखाद्या तटभिंतीसारखें पूर्णपणें मज्जाव करून परतवून लावितां येईल.

२८. Nucleus. अणुगर्भ. अणूचा मध्यवर्ती भाग, एकंदर अणूच्या आकाराच्या मानानें पाहतां, अत्यत सूक्ष्म असून तो अत्यंत घट्ट किंवा गुरुही असतो कारण त्यांतच अणूची सर्व वस्तुता साठविलेली असते. शिवाय तो धनोच्चयीही असतो, अणुगर्भ हा सांप्रतचें सर्व ज्ञान लक्षांत घेतां, धानक आणि वस्तुक या दोनच प्रकारच्या विष्टकांचा बनलेला दिसतो. अणुभार म्हणून जो ठोकळ आंकडा दिलेला असतो त्यावरून त्या अणुगर्भामध्यें एकंदर या दोन्हीही प्रकारचे अल्पक किती आहेत तें कळतें; आणि त्या अणूला जो अणुक्र दिलेला असतो त्यावरून त्याच्या अणुगर्भांत धानक किती आहेत तें कळतें. अणुगर्भांत वस्तुक किती आहेत तें अणुभारांकातून अणुक्र वजा केला म्हणजे जो आकडा येतो त्यावरून समजतें. उदाहरणार्थ ९२ औस्र २३८ च्या अणूमध्यें सर्व धानक आणि वस्तुक मिळून अणुगर्भांत एकंदर अल्पक २३८ आहेत असें समजतें; तसेंच त्या अणूच्या क्र वरून अणुगर्भांत ९२ धानक आहेत हेंही कळतें आणि अर्थात् २३८-९२ = १४६ यावरून वस्तुकांची संख्या अणुगर्भांत १४६ इतकी असल्याचें समजून येतें.

कित्येक मौलांच्या अणुगर्भांमध्यें धानकसंख्या तीच असत्ये पण वस्तुकसंख्या मात्र भिन्न भिन्न असत्ये. या गोष्टीमुळेंच एकाच मौलाच्या अणुभाराच्या बाबतींत अनेक जाति संभवतात. उदाहरणार्थ सूतातूच्या (पाऱ्याच्या) अणुगर्भामध्यें नेहमीं ८० धानकच असावयाचे; परंतु वस्तुकाची संख्या मात्र ११६, ११८, ११९, १२०, १२१, १२२ आणि १२४ इतकी निरनिराळी असूं शकत्ये. या रीतीनें सूतातूला तत्रस्थ एकंदर सात दिसतात. त्यांचे भिन्न भिन्न अणुभार याप्रमाणें १९६, १९८, १९९, २००, २०१, २०२ आणि २०४ असे होतात.

१. Solid स्थाणुद्रववायवः तिस्रोऽवस्थाः।

अणुगर्भामध्यें नुसतेच धानक असणें सयुक्तिक नाहीं कारण त्यांमध्यें ते सर्वच धनोचयी असल्यानें अन्योन्य प्रतिकार असणार. तेव्हां हे अनुचयी वस्तुक त्या प्रतिकारी धानकांना कांहीं ' मायया ' वश करून एकोप्यानें ठेवीत असले पाहिजेत. परंतु हा एकोपा कांहीं वस्तुक जादा आंत घुसडल्यास किंवा कांहीं कमी पडल्यास बिघडून जातो आणि रदक्रिया सुरू होत्ये आणि चालू राहत्ये. ती कोठपर्यंत? पुनश्च त्या त्या अणुगर्भाला मानवेल, पचेल, रुचेल आणि खपेल एवढ्याच प्रमाणांत धानक-वस्तुकांचा मेळावा आंत राहीपर्यंत. ही वस्तुक-धानक यांमधील "माया" काय स्वरूपाची आहे, तिचें मान काय, तिच्याविषयीं नियम काय, इत्यादि अजून चांगलेसें कळून आलेलें नाहीं.

२९. Periodic Table. मौलावर्त. [ मौलगुणावर्त, मौलावर्त कोष्टक. ] मेण्डेलीफ या रशियन विज्ञानें गेल्या शतकांत प्रथमच मौलांची एक विशेष प्रकारानें मांडणी करून दाखविली; ती मौलांच्या अणुभारांच्या अनुरोधानें बसविलेली होती. कांहीं कांहीं महत्त्वाच्या रासायनिक धर्मांच्या दृष्टीनें पाहतां मौलांचे चांगले सोयीस्कर गट त्या माण्डणीवरून पडत असलेले दिसून आले. अणुक्र (किंवा आणवीय क्र ) याचा अर्थ मागें दिलेलाच आहे; आधुनिक मौलांच्या मांडणींत अणुक्र ह्याला महत्त्वाचें स्थान प्राप्त झालेलें असून ' अणुभार ' याला दुय्यम स्थान मिळालेलें आहे. आणवीय क्र याच्या अनुरोधानें मौलांची माण्डणी केली असतां मौलांचे विशिष्ट गट आणि त्यांच्या गुणानुरोधानें बनत असलेल्या चढत्या उतरत्या श्रेणी तर ठळकपणें प्रकट होतातच; पण याशिवाय अणुघटिताच्या दृष्टीनें मौलांचा अनुक्रम कसा आहे हें फारच सुस्पष्टपणें दिसतें. [ अणुक्र आणि अणुघटित पहा. ] कांहीं ठळक रासायनिक धर्म पुनः पुनः आवर्तन पावतात याचें कारणही भ्रमरबीजक कल्पनेवरून चांगलें उपपन्नपणें दिसून येतें. ही उपपत्ति बसविण्याचें आणि दाखवून देण्याचें कार्य मुख्यतः बोर ( डॅनिश ) आणि पॉली ( ऑस्ट्रिअन ) यांनीं केलेलें आहे. याकरितां पॉली यांना नोबल पारितोषिक १९४५ सालीं देण्यांत आलें.

येथें खरें पाहिलें असतां संबंध मौलावर्त, कोष्टकच्या कोष्टक, द्यावयास पाहिजे; परंतु तितका अवसर या लेखांत नाहीं. नुसती मौलनामावलीच द्यावयाची म्हटलें तरी ती देखील त्या त्या मौलनामाच्या निर्वचनासह दिली तरच खरा उपयोग. हें लक्ष्यांत घेऊन या ठिकाणीं प्रस्तुत लेखांत आलेलींच तेवढीं मौल-नामें, इंग्रजी नांव आणि अणुक्र यांच्यासहित, खालीं दिलीं आहेत.

१ उज्जातु hydrogen, २ हेलातु helium, ४ विडूरातु beryllium,

५ टंकातु boron. ६ अर्वातु carbon. ८ ऊर्वातु oxygen,

११ सामुद्रातु sodinm, १७ हरातु chlorine,

८० सूतातु mercury, ८२ शीसातु lead,

८८ रदातु radium, ९२ औस्रातु uranium.

या ठिकाणीं 'हें मौलाचें नांव आहे' याचा द्योतक 'आतु' हा प्रत्यय धातु-यातु या दोन्ही शब्दांपासून 'आतु' हें टोपण वेगळें काढून आलेला आहे असें समजावें.

३०. Pile पुञ्जराशिका अथवा पुञ्जराशिक. औस्रातूची द्वेधा-प्रवणता, आणि द्वेधेपासून निर्माण होणारे अनेक वस्तुक, त्याबरोबर निष्पन्न होणारा मोठा तेजोद्गार आणि विशेष

परिस्थितींत कुबेरातूची होणारी निर्मिति या गोष्टी त्या त्या ठिकाणीं दिलेल्याच आहेत. पुञ्जराशिका ही औस्रातूच्या पुंजांची एक विशिष्ट प्रकारची रचना आहे; तिच्यापासून उष्णता (तेजोद्गार) हें तरी प्रासव्य असतें किंवा कुबेरातु हें तरी प्रासव्य असतें किंवा दोन्हीही प्रासव्य म्हणून गणिलीं तरी चालतील.

पहिली पुञ्जराशिका १९४२ सालीं कॅलिफोर्निया[1] विश्वविद्येच्या पटांगणावर रचिली गेली. तिच्यामध्यें औस्रातु एकंदर १२४०० पौंड वापरला होता. एकंदर रचना गोलकल्प अथवा उलट्या हंड्याच्या आकृतीसारखी झालेली होती. आणि त्या राशिकेमध्यें लिखायतचे (ग्राफाइटचे) ठोकळे आणि त्यांच्यात मधून मधून योग्य अंतरावर पेरलेले औस्रातूचे पुंजके अशी स्थूलमानानें योजना होती.

या पुञ्जराशिकेची कार्यकल्पना आणि रचनेचें धोरण हीं ठोकळमानानें अशीं आहेत. वस्तुकाच्या योगानें औस्राणूची द्वेधा एकदा सुरू केली कीं ती परंपरेनें आणि बेताबेतानें चालू तर राहिलीच पाहिजे ही पहिली आवश्यक गोष्ट. सामान्य औस्रातूमध्यें २३८ वाला तत्रस्थ जो असतो त्यापासून आपल्याला कुबेरातूची निर्मिति करून घ्यावयाची असून २३५ वाल्या तत्रस्थाकडून सानुबन्ध क्रिया चालू ठेवण्याचें काम करून घ्यावयाचें असतें ही दुसरी गोष्ट. आतां कोणत्याही द्वैधेपासून वस्तुक निर्माण झाले म्हणजे ते अत्यन्त वेगस्वी असतात आणि अशा वेगस्वी स्थितींत ते अनेक रीतींनीं फुकट जाण्याचा संभव फार. म्हणून औस्रपुञ्जाच्या भोवतीं लिखायत राशि वापरतात. हेतु असा कीं, वेगस्वी वस्तुक औस्रपुञ्जांतून निघतांक्षणींच त्यांना जिकडेतिकडे मन्दायकं पसरलेला मिळावा. मन्दायकाच्या अणुगर्भाशीं धकाधकी करून हे वस्तुक मन्दावले कीं इतक्यांत पुनः त्यापैकीं कांहींची गांठ औस्र २३८ शीं पडावी म्हणजे ते कुबेरातूच्या निर्मितीच्या मार्गाला लागले. इकडे दुसऱ्या कांहींची गांठ औस्र २३५ च्या अणुगर्भाशीं पडावी म्हणजे ते द्वेधा–क्रियेच्या, अर्थात् वस्तुकांच्या पुनर्निर्मितीच्या, मार्गाला लागले. कुबेरातूची निर्मिति हाच युद्धकालीन पुञ्जराशिकेचा प्रधान हेतु असल्यामुळें तेथील उष्म-निर्मिति ही केवळ आनुषंगिक आणि गौण गोष्ट ठरते.

आतांपर्यंतच्या पुञ्जराशिका उष्मोत्पादनाकरतां नसून केवळ कुबेरातूच्या उत्पादनाकरतांच होत्या; कारण कुबेरातु हें फारच नामी स्फोटक द्रव्य अणुध्वंकरितां हवें होतें. या कारणानें त्या पुञ्जराशिकांचें तरमान फारसें चढूं देत नसत; अर्थात् उष्मापहरणार्थ जी हवावहाळ किंवा पाणवहाळ वापरीत तिच्यांतील उष्णता फुकटच जाई. पण आतां अयुद्ध कालांत जेव्हां मुख्यतः उष्मोत्पादनाकरितांच (म्ह. शक्तिनिर्मितीकरितांच) पुञ्जराशिका वापराव्या लागतील, तेव्हां त्यांचें तपमान योग्य तितकें चढूं दिलें पाहिजे त्यायोगें शक्य तितकी महाप्रेरणिक वाफ तयार करून घ्यावी लागेल आणि त्या वाफेच्या (किंवा इतर मध्यस्थाच्या) साह्यानें यन्त्रें चालवून घ्यावीं लागतील. या कारणानें म्हणजे विनियोग निराळाच झाल्याकारणानें पुञ्जराशिकांच्या रचनेंत तदनुरूप कांहीं फेरफार करून घ्यावे लागतील. पण एक गोष्ट मात्र या संबंधांत दुर्लक्षितां येणार नाहीं आणि ती अशी कीं पुञ्जराशिका चालविणें त्यांचें नियन्त्रण करणें इत्यादि सर्व गोष्टी दुरूनदुरून आणि योग्य बचावाचीं साधनें वापरून कराव्या लागतील. कारण पुञ्जराशिकांपासून जीं प्रारणें (गामकिरण इत्यादिसारखीं) बाहेर पडतात तीं मोठीं घातक होऊं शकतात. तेज तारी आणि तेज मारी अशी स्थिति आहे. पुञ्जराशि-

१. University

कांहीं संबद्ध असणारीं बहुतेक द्रव्यें रादनिक म्ह. रदक्रियाशील असतात ही गोष्ट न विसरतां पुञ्जराशिकांचीं कामें मोठ्या दक्षतेनें आरोग्य सांभाळूनच करावीं लागतात आणि तशींच तीं करावीं लागतील.

३१. Plutonium कुबेरातु, Neptunium पद्मा.

३२. Power तरस्विता; तरःस्व. याचा अर्थ कृतसंपादनत्वरा, कृतसंपादनाचा झपाटा. कृतसंपादनावरूनच शक्ति अ० तेज हीं मापलीं जातात; म्हणून अमुक एका अवधीमध्यें अमुक शक्तिसंपादन झालें असें कळल्यास कृतसंपादन / अवधि या भागाकारावरून तरस्विता ठरत्ये. तसेंच तरस्विता माहित असल्यास त्या तरस्वितेनें अमुक अवधींत कृतसंपादन किती झालें हें गुणाकारानें निघतें. तरस्विता×अवधि=कृतसंपादन. कृतसंपादनाच्या जागीं शक्तिसंपादनही म्हणतां येईल. एवढेच नव्हे तर, शक्ति विनियोग किंवा शक्तीची खपणूक असें ही म्हणतां येईल. विवक्षित तरस्विता शक्तीच्या संपादनाकरितां ( उत्पादनाकरितां ) आहे कां शक्तीच्या विनियोगाकरितां ( म्ह० खपणुकीकरितां ) आहे या गोष्टीवर तें अवलंबून राहील. ओज, तुरग आणि सहस्रौज हीं तरस्वितेचीं एकधेयें क्रमाक्रमानें मोठीं होत गेलेलीं असून ती फार उपयुक्त आहेत. विपळागणिक एक फुटपौंड हें एक छोटेसें प्रारंभिक एकधेय माहित असावें म्हणजे पुढील एकधेयांचा क्रम असा :—

१ ओज = ०.७४ विपलागणिक फुटपौंड ( वि. ग. फु. पौं. )
१ तुरगी अ० तुरग = ५५० वि. ग. फु. पौं.
१ सहस्रौज = ७४० वि. ग. फु. पौं.

३३. Proton धानक. एक धनोच्चय ज्याच्यावर आहे असा अल्पक. वीजकावर एक ऋणोच्चय असतो; धानकावर तितकाच उच्चय पण तो धनोच्चय असतो. धानकाची वस्तुता वीजकाच्या १८२० पट असत्ये. सामान्य उज्जाच्या अणुगर्भात केवळ एकच एक धानक असतो. अन्य मौलांच्या अणुगर्भांमध्यें कांहीं धानक आणि त्याच्या समवेत कांहीं वस्तुक असें असतें; जितके धानक तितके वस्तुक तर असतातच; पण बहुधा वस्तुकांची संख्या धानकांपेक्षां थोडी अधिकच असत्ये. उ० ९२ औ २३५ या अणुगर्भामध्यें धानक ९२ असून त्यांच्याशीं समवेत १४३ वस्तुकही अणुगर्भात असतात.

३४. Radioactivity रदक्रिया. कांहीं मौलांमध्यें रदक्रिया हा गुण स्वभावतःच असतो· त्याच्या योगानें त्या मौलाचा अणु आपोआप विशिष्ट वेगानें ऱ्हास पावत असतो, कारण त्याच्या गर्भातून अ शर, ब शर, आणि ग शर हे बाहेर पडत राहतात. मौलावर्त कोष्टक पाहिल्यास त्यांत लक्ष्यांत घेण्यासारखी गोष्ट अशी कीं ८३ क पासून ९२ क पर्यंतचे मौल कमीअधिक मानानें रादनिक अथवा रदक्रियाशील आहेत. उदाहरणार्थ रदातु याचा क ८८ आहे आणि हा बराच रदक्रियाशील आहे. याच्या अणुगर्भातील धानक क्रमाक्रमानें कमी होतां होतां शेवटीं गाडी ·शीस ८२ या ठिकाणीं येऊन थांबते; म्ह० विवक्षित रदाणूचा शीसाणु बनला म्हणजे ऱ्हास थांबला.

१९३० सालापासून कृत्रिमरीत्या रादनिक द्रव्यें बनवितां येऊं लागलीं आहेत. बहुतेक सर्व मौलांच्या अणूंना कृत्रिमपणें ( अणुक्रिया[1]–योगानें ) रादनिक बनवितां येऊं

१ अणुक्रिया म्ह० अणुगर्भावर शरप्रहार, हेलुक इत्यादि अस्त्रांचा मारा केल्यानें घडलेला अणुच्छेद.

लागलें आहे. अशा द्रव्यांना विरादनिक द्रव्यें म्हणतात; त्यांचा चिकित्सा-क्रियेंत फारच उपयोग होऊं लागला आहे. द्वैधाक्रियेपासून जीं निष्पन्नें होतात त्यांतही विरादनिक द्रव्यें पुष्कळ असतात. रदक्रियेमुळें जें अणुपरिभावन ( अणोरण्वन्तरप्राप्तिः अथवा एका अणुचें दुसऱ्या अणूंत रूपान्तर होणें ) होतें त्याचा झपाटा ' अर्धायु ' या विशिष्ट संज्ञेनें दर्शविला जातो. प्रारंभींच्या अणुसंख्येतील अर्धे अणु परिभावन पावले, अर्थात् अपरिभावित अणूंची संख्या प्रारंभींच्या एकंदर अणूंच्या निम्मी झाली, म्हणजे ही गोष्ट होण्याला जो अवधि लागला असेल त्याला ' अर्धायु ' म्हणतात. विशिष्ट मौलाचा विवक्षित राशि घेतल्यास, त्याचा पहिला अर्धायुकाल गेला म्हणजे त्याचे अपरिभावित अणु निम्मे सांपडतील, दुसरा अर्धायुकाल गेला म्हणजे अपरिभावित अणु पुनः त्याच्याही निम्मे सांपडतील म्ह० अर्थात् प्रारंभिक अणुसंख्येचा चतुर्थांश अणु इतके अपरिभावित सांपडतील. याप्रमाणें पुढें पुढें ऱ्हास किती होत जाईल हें ' अर्धायु ' मानावरून ठीक समजतें. औस्रातु २३८ चें अर्धायुमान ४.६७ अब्ज वर्षें, रदातूचे १६९० वर्षें असें आहे. कित्येक रादनिकांचें अर्धायु दिवसांत मोजण्यासारखें असतें तर कित्येकाचें पळांत किंवा विपळांतच मोजण्यासारखेंच भरतें. उदाहरणार्थ विरादनिक-सामुद्रातूचें अर्धायुमान १५ तास असतें; तर विरादनिक-स्फुरातूचें अर्धायुमान २॥ पळें असतें !

नैसर्गिक रदक्रियेमध्यें अणुगर्भातून अ, ब, ग अशी त्रिशरी बाहेर पडत असत्ये हें मागें सांगितलेंच आहे. त्यांतील अ शर बाहेर पडण्यानें अणूची वस्तुता ४ लवांनीं कमी होत्ये आणि अणुचा क्र २ नें कमी होतो. जेव्हां ब शर बाहेर पडतो तेव्हां अणु क्र एकानें वाढतो पण वस्तुता तीच राहत्ये. कारण ब अल्पकाला ऋणोच्चय एक असतो आणि वस्तुता मुळींच नसत्ये. ऋणोच्चय एक कमी होणे म्हणजेच धनोच्चय एकानें वाढणें या कारणानें क्र एकानें वाढतो. आतां ग शर ( अथवा गामुक ) जेव्हां बाहेर पडतो तेव्हां अणुगर्भाच्या वस्तुतेंतही फरक पडत नाहीं आणि अणु क्र मध्येंही फरक पडत नाहीं. कारण गामुक अल्पकाला वस्तुताही-म्हणण्यासारखी-नसते आणि उच्चयही नसतो.

विरादनिक द्रव्यांमध्यें एक विशेष असा दिसून येतो कीं त्यांच्या अणुगर्भातून पुष्कळ वेळा ध ( म्ह० धन वीजक[१] ) बाहेर पडतो; म्हणजे अर्थात् या कारणानें तें द्रव्य, मौलावर्त कोष्टकांत, एक घर मागें सरकतें—वस्तुतेमध्यें फरक न पडतां !

३५. Uranium. उस्र ( = किरण ) → औस्र + आतु. आतु हा मौलत्ववाचक प्रत्यय आहे. औस्रातु हा रादनिक द्रव्यांपैकीं आहे इत्यादि गोष्टी वर आलेल्याच आहेत.

—— ——

१ positron, positive electron.

# आनन्दवर्धनाचा
# ध्वन्यालोक

अनुवादक :
प्रा. पु. ना. वीरकर,
एम्.ए., बी.टी., टी.डी.
(लंडन).

[ भूमिकाः—संस्कृत साहित्यशास्त्र जगाच्या वाङ्मयांतहि मोलाची मर टाकणारें असून, त्यांत ' ध्वन्यालोक ' हा ग्रंथ फारच वरच्या दर्जाचा व प्रमाणभूत म्हणून मानला गेला आहे. श्लोकरूप कारिका आणि गद्य वृत्ति अशी ग्रंथाची रचना असून, कारिकांत सर्व विषय सूत्ररूपानें सांगितला आहे व त्याचें सोदाहरण व सुविस्तृत विवरण म्हणजे वृत्ति होय. [ कारिका आणि वृत्ति दोन्ही एकानेच लिहिल्या कीं त्याचे दोन स्वतंत्र कर्ते आहेत ह्याबद्दल दुमत आहे. पण हें मात्र निश्चित की वृत्ति आनंदवर्धनाने लिहिली. ]

भरतमुनीने ' नाट्यशास्त्र ' लिहून ' रस ' हाच प्रधान होय असें प्रतिपादिलें. त्यानंतरच्या काळांत अलंकार, रीति, इत्यादि बाह्यांगांनाच अवास्तव किंमत आली. आनंदवर्धनाने आपल्या ग्रंथामध्ये दृष्टीआड होऊं लागलेल्या रसाचें प्रामुख्य पुन्हा प्रस्थापित केलें, व तसें करतांना आपला ध्वनि-सिद्धान्त पद्धतशीरपणें मांडला. औचित्यतत्त्वाचें आणि सूचकतेचें ( suggestion ) महत्त्व जागोजाग गाइलें, व त्याबरोबरच, पूर्वसूरींनी काव्यांतील जीं जीं तत्त्वें प्रमुख म्हणून प्रतिपादिलीं होतीं, तीं तीं सर्व एकत्र करून, त्यांचा उत्तम तऱ्हेने समन्वय लावून, तीं रसापेक्षा गौणच असलीं तरी काव्याला अत्यंत उपकारक, त्याचें सौंदर्य वाढविणारीं, म्हणून सांगितलें.

'ध्वनी'वर मराठींत अत्यल्प लिहिलें गेलें. आणि ग्रंथ तर समजावयास फार कठीण. पण मराठी वाचकांनी त्याला मुकूं नये म्हणून, ध्वन्यालोकाचा म्हणजे कारिका आणि वृत्ति या दोहोंचा मराठी अनुवाद प्रा. वीरकरांनी हातीं घेतला आहे. तो संक्षेपतः कांही लेखांकांच्या द्वारें देण्यांत येणार आहे. कारिकेचा आशय जिथे वृत्तींत पूर्णपणें येत आहे तेथे, संक्षेपहेतूने, कारिका सर्वस्वीं गाळलेली आढळेल.

ध्वन्यालोककाराने वाचकाचे ठिकाणीं पूर्वीच्या साहित्यशास्त्राचा परिचय गृहीत धरलेला आहे. अनुवाद करतांना वाचकाच्या सोयीसाठीं जागोजाग टीपा दिल्या आहेत. तथापि वाचकाची अलंकार इत्यादिकांशीं तोंडओळख तरी झालेली असली पाहिजे.

—संपादक. ]

काव्याचें मर्म जाणणारे विद्वान् काव्याच्या ' ध्वनि ' नामक आत्म्याची, पूर्वीपासून आजवर परम्परेने उत्तमप्रकारें प्रसिद्धि करीत आले. तो ( ध्वनि ) सहृदयांच्या अन्तःकरणास उघड उघड भासमान होत असूनहि ' अस्तित्वांतच नाही, ' असें कांहीजणांनी प्रतिपादिलें ! दुसऱ्या कांहींनी, ध्वनि नांव असलेल्या त्या काव्यात्म्याला, ' लाक्षणिक अर्थच ' म्हटलें. तर आणखी कांहीजण, स्वतःची बुद्धि ध्वनीचें लक्षण करतां येण्याइतकी प्रगल्भ झालेली नसल्यामुळे,

'ध्वनीचें यथार्थ स्वरूप शब्दांनी सांगतां येण्याच्या पलीकडे, अतएव सहृदयांलाच कळूं शकणारें आहे' असें बोलून मोकळे झाले.

तेव्हा, असे अनेक प्रकारचे मतभेद प्रचलित असल्यामुळे, सहृदयांच्या मनास समाधान लाभावें म्हणून, त्या ध्वनीचें स्वरूप आम्ही सांगतों. कारण तें स्वरूप अतिशय रमणीय असून, सर्व सत्कवींच्या काव्यांतील सारसर्वस्वहि तेंच आहे. आणि तरी देखील प्राचीन काव्यशास्त्रकारांच्या अगदी सूक्ष्म बुद्धीने तें आजपावेतों प्रकाशित होऊं शकलेलें नाहीं ! आणि शिवाय, रामायण, महाभारत इत्यादि काव्यें वाचतांना जे नेहमी ठरलेल्या दृष्टीनेच पहातात, म्हणजे अलंकार इत्यादि सुप्रसिद्ध काव्यप्रकार हुडकून काढण्याकडेच ज्यांची प्रवृत्ति असते, त्या सर्व सहृदयांच्या अन्तःकरणास चिरस्थायी स्वरूपाचा आनंद मिळवून द्यावा, या बुद्धीने ध्वनीचें स्वरूप आम्ही स्पष्ट करून दाखवीत आहोंत. प्रथमतः, त्या ध्वनीचें लक्षण करूं पाहणाऱ्याची मनोभूमिका तयार करण्यासाठी आम्ही असें म्हणतों—

शरीराचें सारसर्वस्व आत्मा हें होय. त्याप्रमाणे ललित ( म्हणजे गुण, व अलंकारांनी मंडित ) आणि उचित ( म्हणजे रसाविष्करण करण्यास योग्य ) अशा शब्दार्थांच्या रचनेने सौन्दर्य प्राप्त झालेल्या काव्याचें सारसर्वस्व कोणतें ? तर (आजवरच्या शास्त्रकारांच्या दृष्टीने तें सारसर्वस्व म्हणजे) अर्थ असें ठरून गेलेलें आहे. त्या[१] अर्थाचे, 'वाच्य' आणि 'प्रतीयमान' असे दोन प्रकार आहेत.

त्यापैकी 'वाच्य' अर्थ म्हणजे जो सुप्रसिद्ध आहे, तो. उपमा इत्यादि प्रकार वर्णन करून, इतर काव्यशास्त्रकारांनी त्याचें आजवर निरनिराळ्या रीतींनी भरपूर विवरण केलें आहे.

म्हणून त्याचा आम्ही येथे विस्तार करीत नाहीं. पुन्हा जेव्हा जरूर लागेल तेव्हा त्याचा केवळ नामनिर्देश करूं, म्हणजे झालें.

परंतु या वाच्याखेरीज दुसरेंच, प्रतीयमान नांवाचें तत्त्व, महाकवींच्या वाणींत असतें. तें सहृदयांच्या हृदयास चांगलें माहीत आहे. सुंदर अङ्गनांमध्ये लावण्य ही जशी सर्व अवयवांच्या पलीकडची, वेगळी उठून दिसणारी, सहृदयांच्या लोचनास अमृताप्रमाणे आनन्दविणारी, अवर्णनीय अशी कांहीं तरी दुसरीच गोष्ट असते, तसाच तो प्रतीयमान

---

१ वास्तविक काव्याचा खरा आत्मा लेखकाच्या मतें सुंदर असा ' व्यङ्ग्य ' किंवा ' प्रतीयमान ' अर्थच. पण ' ध्वनी 'ची ज्याला कांहीं एक कल्पना नाहीं, त्याला हा ' प्रतीयमान ' अर्थहि अपरिचितच असणार ! म्हणून अशा माणसास नीटपणें समजावें याकरिता येथे प्रथम त्याचीच कल्पना गृहीत धरून मग तिची योग्य ती फोड करून दाखविली आहे. 'अर्थ हा काव्याचा आत्मा आणि वाच्य व प्रतीयमान हे त्याचे दोन प्रकार' असें म्हटल्याने ते दोन्ही मिळून काव्याचा आत्मा आहेत असें म्हटल्यासारखें वाटतें. पण लेखकाचा आशय तसा नाहीं. कारण ग्रन्थांत सर्व ठिकाणीं त्याने 'प्रतीयमाना'लाच आत्मा म्हटलेलें आहे, वाच्यार्थाला नाहीं. म्हणून " ज्याला लोकांनी आत्मा म्हणून ठरविलें आहे, त्या 'अर्था'चे ' वाच्य ' आणि ' प्रतीयमान ' असे दोन भेद असून माझ्या दृष्टीने त्यांतला प्रतीयमान हाच काव्याचा खरा आत्मा आहे " इतका लेखकाचा आशय या ठिकाणीं गृहीत धरणें भाग आहे.

अर्थ ( शब्द, अर्थ, शब्दालंकार, अर्थालंकार, इत्यादि अवयवांहून निराळाच ) असतो. कारण वाच्य अर्थ आपल्या सामर्थ्याने वस्तु[1], अलंकार, किंवा रस इत्यादि जें जें अनुभवास आणील. त्याच्या अनुरोधाने तो (प्रतीयमान[2]) अर्थ निरनिराळ्या प्रकारचा असूं शकतो, असें आम्ही पुढे दर्शविणार आहोंत. आणि त्या सर्व प्रकारांमध्ये तो अर्थ वाच्याहून निराळा आहे. उदा० पहिलाच (वस्तु) प्रकार पाहा. त्याच्यांत अन् वाच्यांत जमीनअस्मानाचें अन्तर आहे. कारण कांही वेळां वाच्य अमुक एक कर म्हणून सांगत असतां, हा अर्थ त्याच्या अगदी उलट, म्हणजे 'तें करूं नको' असें सांगतो ! उदा०

हे धार्मिका, तूं अगदी निःशंकपणें येथें हिंड.[3] ( ज्याला तूं भीत होतास ) तो कुतरडा, गोदानदीकांठच्या या वेलींच्या जाळींत वास्तव्य करून असलेल्या त्या उन्मत्त सिंहाने आज मारून टाकला आहे.

केव्हा केव्हा वाच्य निषेधपर असतां हा अर्थ विधिरूप (अमुक एक 'कर' म्हणून सांगणारा) असतो. जसें:—

'अरे रातांधळें असलेल्या मुशाफिरा, इथे माझी सासू गाढ झोपेंत निमग्न होऊन

---

१ वाच्यार्थ समजल्यावर त्याच्या सामर्थ्याने सूचित केलेला अर्थ जर शब्दांत मांडून दाखवितां येण्याजोगा ( म्हणजे एखादी कल्पना, कांही माहिती, अशा प्रकारचा ) असेल, तर तो ( सूचित अर्थ ) 'वस्तु' प्रकारांत मोडतो. वस्तु म्हणजे शब्दांत जें मांडून दाखवितां येईल, तें. मग तो एखाददुसरा शब्द असेल, किंवा एक अगर अनेक वाक्यें असतील. हाच प्रतीयमान-शब्दांत मांडल्यावर तो एक अलंकार आहे असें आढळून आलें, तर तें प्रतीयमानाच्या दुसऱ्या, म्हणजे 'अलंकार' प्रकाराचें उदाहरण झालें. तिसरा— आणि सर्वांत महत्त्वाचा म्हणजे 'रस' प्रकार होय. वाच्यार्थ कळल्यावर त्यामुळे जर रस निर्माण झाला, तर तें रस प्रकारचें उदाहरण झालें. अर्थात् या तिन्ही प्रकारांचें सोदाहरण स्पष्टीकरण पुढे यथावकाश केलें जाईलच.

२ याला व्यङ्ग्य असें दुसरेंहि नांव आहे, व तें ग्रन्थांत अनेक ठिकाणीं वापरलेंहि आहे. पण वस्तु ( म्हणजे एखादी कल्पना किंवा एखादें वाक्य ) सूचित होणें आणि रस अनुभवास येणें हे दोन्ही एकाच 'ध्वनी'चे प्रकार मानावयाचे झाले, तर माझ्या मतें 'व्यङ्ग्य' यापेक्षा 'प्रतीयमान' (वाच्यार्थाच्या सामर्थ्याने— अर्थात् वाच्यार्थाखेरीज— जें जें कांही प्रतीत होतें, तें सर्व) हीच संज्ञा अधिक ग्राह्य आहे.

३ कोणा एका तरुणीचें हें संकेतस्थल आहे. आपल्या प्रियकराची मार्गप्रतीक्षा करीत ती तेथें उभी असतांना, फुलें वगैरे गोळा करण्यास आलेला एक भित्रा पण धर्माचरणी मनुष्य, तिला जवळपास हिंडायला नको आहे. म्हणून मोठ्या चातुर्याने वरील वाक्य उच्चारून ती त्याला तेथे भटकण्यापासून परावृत्त करूं पाहते. येथे 'हिंड' हा वाच्यार्थ आहे खरा, पण श्लोक जरा बारकाईने वाचल्यावर 'हिंडूं नको' असा अर्थ सूचित होतो. कुत्रा मेला, पण मारणारा क्रुद्ध सिंह इथल्या जाळींत आहे, हें सांगण्याने, 'तूं इथे हिंडूं नकोस' हेंच ती सुचवीत आहे.

अनुक्रमणिका

पडलेली असत्ये, आणि येथे मी असत्यें. दिवस आहे, तेवढा सर्व वेळभर नीट पाहून घे. आमच्या अंथरुणावर एकदम अडखळून पडूं नकोस[1] हं !'

एखाद्या ठिकाणीं व्यङ्ग्याचा विषयच वाच्याहून अगदी निराळा असतो. उदा० 'प्रियेच्या अधरोष्ठावर वण उमटलेला दिसला, तर कोणास राग येणार नाही ? तेव्हा ('असें करूं नको' असें म्हणून ) निवारण केलें असतांहि न ऐकतां भ्रमर बसलेलें पद्म वळेंच हुंगणाऱ्या हे स्त्रिये, आता भोग ( न ऐकण्याचें फळ ).[2]

प्रतीयमानाचे आणखी याखेरीज दुसरेहि—वाच्याहून अगदी वेगळे असलेले—प्रकार संभवतात. त्यांबद्दल येथे केवळ दिग्दर्शनच केलें आहे. प्रतीयमानाचा दुसरा मोठा प्रकारहि वाच्याहून भिन्न आहे. त्याचें स्वरूप सविस्तरपणें पुढे दाखवूं. परंतु तिसरा रसादिलक्षणी मोठा प्रकार देखील वाच्यार्थाच्या सामर्थ्याने प्रतीत होणारा आहे. तो कांही शब्दांचा प्रत्यक्ष अर्थ नव्हे. कारण, तो वाच्य केव्हा असूं शकेल ? तर रस, शृङ्गार, हेच शब्द वाक्यांत वापरल्याने जर रस निर्माण होत असेल, तर. या पक्षीं, शृंगार रस, असे शब्द वाक्यांत उपयोजिले नाहीत, तर रसप्रतीति होऊंच शकणार नाही असें म्हटल्यासारखें होईल ! आणि, सर्वच ( रसाळ ) लिखाणांतून कांही 'रस' वाचक शब्द ( शृंगार, वीर, वगैरे ) वापरलेले नसतात. ( चुकून एखाद्या ठिकाणीं ते वापरलेले आढळले, तरीहि तेथे रसादींची प्रतीति विशिष्ट प्रकारच्या

---

१ जिचा भर्ता परगांवीं गेला आहे, अशी एक तरुणी, आपल्या घरीं मुक्कामास राहिलेल्या वाटसरास वरीलप्रमाणे सांगते. ' अडखळून पडूं नकोस ! ' असा निषेधपर वाच्यार्थ जरी येथे दिसत असला, तरी 'सासू खुशाल घोरत पडलेली असते' इत्यादि माहितीवरून कोणाला कांही कळावयाचें नाही, तेव्हा दिवस बुडेपर्यंत थांब, आणि मग—आता नीट पाहून ठेवलेल्या माझ्या शय्येवर मुकाट्याने, पण खुशाल ये' असा वाच्याच्या अगदी उलट, म्हणजे विधिरूप असलेला व्यङ्ग्यार्थ आपोआपच समजून येतो.

२ नायकाखेरीज अन्य पुरुषाला भेटून नायिका घरीं परतली असतांना, तिच्या अधरोष्ठावरील वण पाहून नायकाने तिच्याबद्दल संशय घेऊन रागावूं नये, म्हणून तिची सखी चतुराईने तिला सांभाळून घेत आहे. या ठिकाणीं वाच्यार्थ पाहिला, तर तो नायिकेला उद्देशून आहे, पण व्यङ्ग्यार्थ नायकासाठी आहे. 'कोणा पुरुषाला भेटल्याने नव्हे, तर ज्यांत भुंगा आहे असें कमळ हुंगतांना त्या भुंग्याने दंश केल्यामुळेच तिच्या अधरोष्ठावर वण दिसत आहे, तेव्हा संशयाचें मुळीच कारण नाही' हा तो व्यङ्ग्यार्थ होय. वाच्यार्थाचा विषय ( या ठिकाणीं ) नायिका, तर व्यङ्ग्यार्थाचा विषय नायक. म्हणून तात्पर्य हेंच, की व्यङ्ग्यार्थ वाच्यार्थाहून भिन्नच असला पाहिजे.

कालिदासाच्या शाकुंतलांत एका प्रसंगीं दुष्यन्त व शकुन्तला एकान्तांत असतां त्या ठिकाणीं ( दुसरीकडून ) गौतमी आत्या यावयास निघते. तिला तर एकंदर प्रकाराचा पत्ता मुळीच लागूं नये, पण शकुंतलेस तर तिच्या येण्याची वर्दी मिळावी, म्हणून शकुंतलेची चतुर सखी 'चक्रवाकी, आपल्या सहचरास निरोप दे ! रात्र होत आली' असें मोठ्याने म्हणते. अर्थात् 'शकुन्तले, दुष्यन्तास निरोप दे' हा यांतील व्यङ्ग्यार्थ अगदी उघड आहे. येथेहि वाच्यार्थाचा विषय चक्रवाकी, तर व्यङ्ग्यार्थाचा विषय शकुंतला आहे.

[1]विभावादिकांच्या वर्णनाच्या द्वारेंच होते. रसवाचक शब्द तेथे असला, तरी त्याच्या योगाने रसादींच्या प्रतीतीचा केवळ नामोच्चार केला जातो. ती प्रतीति कांही त्या शब्दामुळे उत्पन्न झालेली नसते. कारण, इतर ठिकाणीं ( म्हणजे जेथे रस, शृंगार, असले शब्द वापरलेले नसतात, तेथेहि ) ती ( विभावादिकांच्या वर्णनाच्या योगाने ) होतेच की ! उलट पक्षीं, जेथे विभावादिकांचें मुळीच वर्णन नाही, आणि केवळ शृंगार इत्यादि शब्दच वापरलेले आहेत, अशा काव्यामध्ये रसाचा लवलेशहि असल्यासारखें वाटत नाही. तेव्हा सारांश हाच, की—

ज्या अर्थी नांवें किंवा वाचक शब्द याखेरीज अगदी नुसत्या, विशिष्ट अशा विभावादिकांपासून रसनिर्मिति होते, आणि केवळ नांवांमुळे होत नाही, त्या अर्थी, अन्वय आणि व्यतिरेक याच्या साह्याने परीक्षा करितां, रसादि हे मुळीच वाच्य नसून 'वाच्य' अर्थाच्या सामर्थ्याने निर्माण झालेले दुसरे ( कोणीतरी ) होत, हें स्वच्छ दिसतें. अशा रीतीने प्रतीयमानाचा तिसराहि ( रसादिलक्षणी ) मोठा प्रकार वाच्याहून अगदी भिन्नच होय हें सिद्ध झालें. मात्र या रसादींची प्रतीति वाच्यानंतर लगेच, ( म्हणजे जवळ जवळ वाच्याच्या बरोबरच ) होते, हें आम्ही पुढे दाखवूं.

तोच ( म्हणजे प्रतीयमान ) अर्थ, वाचक शब्द आणि वाच्यार्थ यांच्या नानाविध रचनांमुळे सौन्दर्य प्राप्त झालेल्या काव्याचा, आत्मा होय. उदाहरणार्थ, सहचराला व्याधाने मारिल्यावर, त्याच्या वियोगाने व्याकुळ झालेल्या क्रौंचपक्षिणीचा आक्रोश ऐकल्यामुळे आदिकवीच्या मनांत उत्पन्न झालेला शोकच शेवटीं खालीलप्रमाणे श्लोकरूप पावला.

' हे व्याधा, तुला अनंत वर्षेपर्यंत ( या जगांत ) स्थान लाभणार नाही; कारण क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्यापैकी, काममोहित झालेल्या एकास, तूं ठार मारिलेंस. '

वस्तुतः शोक म्हणजे करुणरसाचा स्थायिभाव. तो प्रतीयमानच होय, वाच्य नव्हे, हें पर सिद्ध केलेंच आहे. रसाखेरीज वस्तु आणि अलंकार हेहि प्रतीयमानाचे मोठे प्रकार आहेत म्हणून सांगितलेलें असलें, तरी येथे त्यांचाहि निर्देश रसादींच्या द्वाराच केला आहे—म्हणजे येथे फक्त रसाचेंच उदाहरण घेऊन तेवढ्यावरून सर्व प्रकारचे 'प्रतीयमान' हे काव्याचे आत्मे आहेत असें म्हटलें—याचें कारण रस-भाव हे ( प्रतीयमानाच्या सर्व प्रकारांत ) [2]श्रेष्ठ आहेत, हेंच होय.

---

१ विभावादिक म्हणजे ज्यांच्यामुळे रसिकाच्या मनांत रसनिर्मिति होते तीं साधनें. उदा०—विभाव, अनुभाव, वगैरे. ज्या पात्रांच्या वर्णनाने रस निष्पन्न होतो, तीं पात्रें म्हणजे (आलम्बन) विभाव होत. भोंवतालच्या ज्या गोष्टी (उदा०—शृंगाररसाचे बाबतीत वसंत, उद्यान, शृंगारलेला महाल, इत्यादि) रस उद्दीपित करितात, त्यांना उद्दीपनविभाव म्हणतात. अनुभाव म्हणजे काव्यांतील वा नाटकांतील पात्रांचे (भ्रूभङ्ग, स्मित, कटाक्ष, वगैरे) रसानुकूल हावभाव.

२ अजून प्रत्यक्ष ध्वनीची कल्पना द्यावयाचीच आहे. आतापर्यंत फक्त प्रतीयमानाचेच प्रकार सांगितले. त्यांतहि रस-प्रकारालाच श्रेष्ठ मानून वस्तु आणि अलंकार या प्रकारांचें देखील शेवटीं रसांतच पर्यवसान होईल याकडे लक्ष्य द्यावें असें लेखकाने पुढे सांगितलें आहे. म्हणूनच या म्हणण्यांतील जास्त महत्त्वाचें तेवढेंच घेऊन साहित्यदर्पणकार विश्वनाथाने ' वाक्यं रसात्मकं काव्यम् ' अशी व्याख्या केली. परंतु हीच रसनिर्मिति वस्तु आणि अलंकार यांपैकी एखाद्या प्रकाराच्या द्वारें केली गेली, तर सूचकतेमुळे त्या काव्याचें सौन्दर्य कितीतरी वाढेल हें ध्वनिकाराचें म्हणणें.

महाकवींच्या दैवी वाणींतून मधुर असें तें ( म्हणजे प्रतीयमान ) अर्थतत्त्व स्रवत असतें. त्यामुळे त्या वाणीमध्ये ( आपणांस ) अलौकिक आणि देदीप्यमान अशा विशेष प्रकारच्या प्रतिभेचें दर्शन घडतें. आणि म्हणूनच अगदी नानाप्रकारच्या कवि-परम्परांनी समृद्ध असलेल्या या जगतांत कालिदास प्रभृति दोनतीन किंवा पांचसहाच जण महाकवि म्हणून गणले जातात.

प्रतीयमान अर्थाचें ( वेगळें ) अस्तित्व सिद्ध करणारें आणखीहि एक प्रमाणभूत असें साधन आहे. तें हें:—

केवळ शब्दार्थ-शास्त्राचें ( व्याकरणादिकांचें ) ज्ञान झालें, तरी तेवढ्यानेच कांही तो अर्थ प्रतीत होत नाही. काव्याचें खरें स्वरूप जाणणारांनाच तो गोचर होतो. अन् जर तो अर्थ 'वाच्य'रूपच असता, तर फक्त वाच्य अर्थ आणि वाचक शब्द यांच्या ज्ञानानेच तो अनुभवास येऊं शकला असता. पण संगीतशास्त्रामधील नुसत्या लक्षणांचीच ज्यांना माहिती झालेली आहे अशांना ज्याप्रमाणे उत्कृष्ट संगीताचें मर्म कळूं शकत नाही, त्याप्रमाणे वाच्यार्थ आणि शब्द यांचीं लक्षणें समजून घेण्याइतकेच परिश्रम ज्यांनी घेतले आहेत, आणि काव्यतत्त्व ज्ञात होण्यास लागणारी मनोभूमिकाच ज्यांचे जवळ नाही, त्यांना काव्याचा तो ( प्रतीयमान ) अर्थ भासूंच शकत नाही.

याप्रमाणे वाच्याहून निराळ्या अशा प्रतीयमानाचें अस्तित्व प्रस्थापित केल्यावर, दोघांत प्रधानहि तोच ( म्ह० प्रतीयमानच ) हें [1]ग्रन्थकार पुढीलप्रमाणे स्पष्ट करितो—

तो ( प्रतीयमान ) अर्थ आणि तो प्रकट करण्यास समर्थ असलेला शब्दहि, एखादाच. सर्वांमध्ये ती शक्ति नाही. तेच शब्दार्थ महाकवीचे होत. ते ओळखण्यास अभ्यासाने शिकावें. कारण, व्यङ्ग्य ( प्रतीयमान ) अर्थ आणि व्यञ्जक शब्द यांचा उत्कृष्ट उपयोग केल्यानेच महाकवींना महाकविपद प्राप्त होतें. केवळ वाच्यार्थ आणि वाचक शब्द उपयोजिल्याने नव्हे.

आता, व्यङ्ग्य आणि व्यञ्जक हे वाच्यार्थाहून प्रधान असतांनाहि, कविलोक प्रथम वाच्य ( अर्थ ) आणि वाचक ( शब्द ) यांचीच जुळवाजुळव करितात, तेंहि योग्यच करितात, हें लेखक दर्शवितो——

प्रकाश हवा अशी इच्छा असतांना देखील मनुष्य प्रथम दिव्याच्या वातीच्या सुव्यवस्थेबद्दल खटपट करितो. कां ? तर वात हें प्रकाशाचें साधन म्हणून. प्रकाश कांही कधी दिव्याच्या वातीशिवाय उत्पन्न होऊं शकत नाही. त्याचप्रमाणे व्यङ्ग्यार्थ निर्मूं पाहणारा कवि आधी वाच्यार्थ नीट आहे किंवा नाही, हें पाहण्याचे परिश्रम घेतो. अशा रीतीने, व्यङ्ग्यार्थ प्रतिपादन करूं पाहणाऱ्या कवीला, ( व्यङ्ग्यार्थासाठी ) कोणत्या मार्गाने प्रयत्न करावा लागतो, हें लेखकाने दर्शविलें.

---

१ लेखक, ग्रन्थकार, इत्यादि नामें 'वृत्ति'काराने 'कारिका'काराबद्दल वापरलेलीं आहेत. मात्र केवळ येवढ्यावरूनच वृत्ति आणि कारिका यांचे कर्ते निराळे असले पाहिजेत असा ग्रह कोणीं करून घेऊं नये, कारण कांही संस्कृत ग्रन्थकार, स्वतःच कारिका आणि वृत्ति यांचे लेखक असूनहि, वृत्तीमध्ये कारिकाकाराचा, म्हणजे स्वतःचाच तृतीयपुरुषीं उल्लेख करितात.

आता काव्य वाचणाऱ्या रसिकांचाहि मनोव्यापार दर्शवावा, म्हणून लेखक म्हणतोः—

जसा एखाद्या वाक्याचा अर्थ पदांच्या म्हणजे शब्दांच्या अर्थांच्या प्रतीतिद्वारा प्रतीत होतो, तसाच व्यङ्ग्यार्थाचाहि बोध वाच्यार्थाच्या बोधाचे द्वारेंच होतो.

आता, वाच्यार्थाची प्रतीति जरी व्यङ्ग्यार्थ-प्रतीतीच्या आधी होणें अवश्य असलें, तरी त्याने व्यङ्ग्यार्थाचें प्राधान्य यत्किंचित्‌हि कमी होत नाही, हें ग्रन्थकार सांगतो—

शब्दार्थ जरी आपल्या सामर्थ्याच्या योगानेच वाक्यार्थ प्रकट करीत असला, तरीहि आपल्या कार्याची सिद्धि झाल्यावर, ( म्हणजे रसिकास वाक्यार्थ समजल्यावर ), तो जसा वेगळेपणाने दिसून पडत नाही, तसाच तो ( प्रतीयमान ) अर्थ, वाच्यार्थात मन न रमल्यामुळें त्याकडे पाठ फिरवणाऱ्या सहृदयांच्या, सार तेवढेंच बघणाऱ्या दृष्टीला, चटकन् गोचर होतो.

अशा रीतीने वाच्याहून पार निराळ्या व्यङ्ग्य अर्थाचें अस्तित्व प्रस्थापित केल्यावर प्रस्तुताशीं, म्हणजे 'ध्वनी' शीं त्याचा सम्बन्ध जोडण्यासाठी लेखक म्हणतोः—

**जेथे वाच्य अर्थ स्वतःला, किंवा वाचक शब्द आपल्या वाच्यार्थाला [1]गौणत्व देऊन तो व्यङ्ग्य अर्थ सुचवितो, तो उत्कृष्ट काव्यप्रकार म्हणजेच कवींनी सांगितलेला ध्वनि होय.**

अशा प्रकारें व्याख्या केल्याने, शब्दांच्या अनुप्रास इत्यादि आणि वाच्यार्थांच्या उपमा इत्यादि अलंकारांहून ध्वनीचा विषय पार वेगळाच आहे हें लेखकाने स्पष्ट केलें.

सारांश, व्यङ्ग्य आणि व्यञ्जक, यांच्यावरच ध्वनि अधिष्ठित झालेला आहे. वाच्य आणि वाचक यांचें सौंदर्य खुलविणारीं जीं साधनें आहेत, तीं ध्वनीचीं केवळ अङ्गें आहेत. तो आणि तीं साधनें एकरूप केव्हाहि नव्हत. सहृदयांच्या हृदयास आह्लाद देणारा, काव्याचा प्राण असलेला असा तो 'प्रतीयमान' अर्थ जेथे नाही, तें सर्व 'चित्र'[2] काव्यच होय असें आम्ही पुढे दर्शविणार आहोंत.

यानंतर कांही आक्षेपक असें म्हणतीलः— 'जेथे व्यङ्ग्यार्थ स्पष्टपणें प्रतीत होत नसेल तेथे 'ध्वनि' आहे असं तुम्ही नका म्हणूं हवं तर. पण जेथे तो प्रतीत होत असेल, ( उदा० समासोक्ति,[3] आक्षेप, अनुक्तनिमित्त विशेषोक्ति, पर्यायोक्त, अपह्नुति, दीपक, संकरालंकार,

---

१ ध्वनीची ही व्याख्या पाहिली, म्हणजे 'व्यंग्यार्थ म्हणजेच ध्वनि' अशी कांहींनी करून घेतलेली दिसते तशी चुकीची कल्पना होण्याचें कारणच उरत नाही.

२ 'चित्र' काव्य म्हणजे निकृष्ट दर्जाचें काव्य. त्यांत व्यङ्ग्य मुळींच नसून केवळ वाच्याचीच चमत्कृति असते.

३ येथे उल्लेखिलेल्या सर्वच अलंकारांचीं लक्षणें येथे स्थलाभावीं देतां येणार नाहीत. दिग्दर्शनार्थ फक्त समासोक्तीचीच कल्पना देतों.:—

प्रस्तुत गोष्टीचें वर्णन करितांना, केवळ विशेषणेंच द्व्यर्थी वापरल्यामुळें जर अप्रस्तुत असलेली दुसरीच एकादी कल्पना सूचित होत असली, तर तेथे समासोक्ति अलंकार समजावा. मात्र अशा ठिकाणीं प्रत्यक्ष वर्ण्य गोष्टीचा वाचक जो शब्द असेल, तो द्व्यर्थी असत नाही. समासोक्ति अलंकाराच्या उदाहरणाकरिता पुढील पानावरचा 'राग धारण करणाऱ्या चन्द्राने...' इत्यादि श्लोक, आणि तळटीप पाहा.

इत्यादि ठिकाणीं ) तेथे ध्वनीचा अन्तर्भाव झालाच आहे कीं ! ' तर अशा रीतीने पूर्वीच्या लक्षणकारांनी सांगितलेल्या सौन्दर्यहेतूंतच ध्वनि येऊन गेला, असें भासविण्याचा प्रयत्न त्यांनी करूं नये, म्हणूनच ग्रन्थकर्त्याने ' ध्वनी ' च्या लक्षणांत ' वाच्य अर्थ स्वतःला आणि वाचक शब्द स्वतःच्या ( वाच्य ) अर्थाला गौणत्व देऊन ' असें मुद्दाम म्हटलें. व्यङ्ग्य जेथे प्रधान, प्रमुख असेल, तेथे ध्वनि असावयाचा. असें कांहीं [1]समासोक्ति इ० मध्ये असत नाहीं. समासोक्तीमध्येंच पहा ना—

राग ( १–रक्तिमा, २–प्रीति ) धारण करणाऱ्या चन्द्राने, विलोल तारकांनी (१–चांदण्या, २–बुबुळें ) युक्त असलेलें निशेचें मुख ( १–प्रारंभ, २–वदन ) असें ग्रहण केलें ( १–प्रकाशित केलें, २–हातांत धरलें. ) आहे, की त्यायोगें सगळेंच्या सगळेंच तिमिररूपी वस्त्र पूर्वेकडे ( दुसरा अर्थ-'पुढे' ) गळून पडलेलें देखील रागामुळे ( १–रक्तिमा, २–प्रीति ) तिच्या ध्यानांत आलें नाहीं !

या उदाहरणांत वाच्य अर्थच मुख्यत्वेंकरून प्रतीत होतो. व्यङ्ग्य अर्थ ' वाच्य ' अर्थाचा केवळ अनुयायी आहे. कारण, चन्द्र आणि निशा यांचेवर नायक आणि नायिका यांचे व्यवहार लादले असून चन्द्र आणि निशा हेच वस्तुतः प्रस्तुत होत. त्यांचेंच वर्णन करणें हा कवीचा मुख्य हेतु आहे.

दीपक, अपह्नुति इत्यादींमध्ये व्यञ्जनेच्या द्वारा उपमा प्रतीत होत असली, तरी प्राधान्याने ती सांगावयाची नसल्याने तेथे उपमेचा व्यवहार नसतो. तसेंच ' आक्षेपा 'मध्येहि व्यङ्ग्यार्थ सुचविणारा जो निषेधात्मक वाच्यार्थ, तोंच तेथे अधिक रमणीय असतो. वाच्य आणि व्यङ्ग्य यांमध्ये प्रधान कोणतें हें ठरवावयास ( प्रस्तुत कीं अप्रस्तुत या विचाराखेरीज आणखी एक प्रमुख ) साधन म्हणजे सौन्दर्य हें होय. दोघांपैकी जें अधिक सुन्दर[2] असेल, तेंच कवीला मुख्यत्वेंकरून सांगावयाचें असतें, असें समजावयाचें.

---

१ समासोक्तीचें मराठी कवितेंतील एक उदाहरण खालीलप्रमाणे—

करितां विलाप शल्या ! व्याकुळ होशील, कंठ वाळेल !
असती तव उक्ति, हिला धर्मात्मा कर्ण हा न भाळेल ॥

या आर्येतील दुसऱ्या ओळींत ' उक्ति ' ही प्रस्तुत आहे. ' तुझें म्हणणें खोटें आहे, व त्यामुळे हा कर्ण फसणार नाहीं ' हा त्या ओळीचा वाच्यार्थ झाला. पण 'अ–सती,' 'भाळेल' इत्यादि श्लिष्ट शब्दांमुळे कुलटा स्त्रीचें चित्र आपल्या मनश्चक्षूंसमोर उभें राहतें, आणि तेणेंकरून ' कुलटा असलेल्या तुझ्या उक्तीवर कर्ण कधीच मोहित होणार नाहीं ' असा व्यङ्ग्यार्थहि प्रतीत होतो. परंतु कुलटेचें वर्णन येथे अप्रस्तुत असून ' उक्ति ' हीच प्रस्तुत असल्यामुळे वाच्यार्थालाच प्राधान्य मिळून व्यंग्यार्थ गौण ठरतो. त्यामुळे हें उदाहरण ध्वनीचें नाहीं.

२ ' सूर्य मावळला ' हें वाक्य ध्वनीचें उदाहरण म्हणून एका मराठी निबंधांत म्हटलें आहे. शेतांत काम करणारांच्या समुदायांत हें वाक्य उच्चारलें गेल्यास, 'घरीं जाण्याची वेळ झाली' असा व्यंग्यार्थ त्यांतून निघतो. पण असले शब्दप्रयोग कितीं नेहमीचे आहेत ! त्यांत विशेष सौंदर्य नाहीं. अशीं वाक्यें व्यंग्यार्थांचीं उदाहरणें होतील, ध्वनीचीं होणार नाहीत. भामहाने देखील अशा वाक्यांना 'काव्य' म्हटलें नाहीं, 'माहिती' म्हटलें.

पर्यायोक्त, संकरालंकार, अप्रस्तुत प्रशंसा, इत्यादि अलंकारांमध्येहि व्यंग्यार्थ प्रधान असतोच, असें नाही. तथापि या अलंकारांच्या उदाहरणांमध्ये एखाद्या ठिकाणीं व्यङ्ग्यार्थ प्रमुख असलेला आढळलाच, तर त्याचा 'ध्वनी'मध्ये अन्तर्भाव होईल. ध्वनीचा अन्तर्भाव मात्र त्यांच्यांत केव्हाहि करतां येणार नाही. कारण ध्वनीचें क्षेत्र फार मोठें असून तो अङ्गी आहे, अंग नव्हे, हें आम्ही पुढे सांगणार आहोंत. अलंकार, गुण, वृत्ति, इत्यादि सारीं, प्रमुख जो ध्वनि, त्याचीं अङ्गें होत. तेव्हा एकंदरींत तात्पर्य असें—

व्यङ्ग्याचा जेथे नुसता आभास होत असेल, किंवा जेथे तो वाच्यार्थाचा अनुयायीच असेल, अगर जेथे त्याचें प्राधान्य स्पष्टपणें प्रत्ययास येत नसेल, तेथे ध्वनि नाही. तेथे 'समासोक्ति' आदिकरून वाच्यालंकारच आहेत असें समजावें.

ज्या ठिकाणीं शब्द आणि अर्थ यांचें कार्य केवळ व्यङ्ग्यार्थाची प्रतीति करून देणें हेंच असतें, तोच ध्वनीचा निःसंदिग्ध, अ-संमिश्र विषय, असें जाणावें.

तर येणेंप्रमाणे ध्वनीचा अभाव प्रतिपादन करणाऱ्यांच्या मताचें (ग्रन्थकाराने) खंडन केलें.

( अपूर्ण )

---

## परिभाषा ठरवितांना

फर्ग्यूसन कॉलेज, पुणें ४.
ता. १९–९–१९४७.

### श्री. संपादक "महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका"—यांस

पत्रिकेच्या गेल्या (एप्रिल–जून १९४७) अंकांतील प्रा. स. वि. आपटे यांचा "अणुगर्भीय परिभाषा" हा लेख वाचून सुचलेले कांही विचार वाचकांपुढे मांडीत आहें.

(१) हिंदी भाषांतील शास्त्रीय व इतर परिभाषा ठरवितांना प्रथम एक मुख्य प्रश्न लक्षांत घेतला पाहिजे तो हा की, नवीन शब्द फक्त मराठींत वापरावयाचे आहेत कीं हिंदुस्थानातील संस्कृतोद्भव व संस्कृतावलंबी अशा सर्व भाषांत वापरावयाचे आहेत ? जर ते केवळ मराठींत वापरावयाचे असतील तर मग "बीज" किंवा त्यापासून बनलेले "बीजक" असे शब्द चालतील ( इतर दृष्टींनी ते समर्पक असतील तर ). पण जर हे शब्द इतर भाषांतहि स्वीकारले जावे अशी अपेक्षा असेल तर मात्र होतां होईतों संस्कृत मूळ धातूपासून अगर शब्दापासून व्युत्पन्न असे शब्द बनवणें जरूर पडेल. नव्या भारतांत उच्च शिक्षणापर्यंत सर्व व्यवहार ज्या त्या प्रादेशिक भाषेंत व्हावा व होणार हें आता ठरलेलेंच आहे. अर्थात् प्रत्येक भाषेंत वेगळे वेगळे पारिभाषिक शब्द असणें अनिष्ट आहे हेंहि विचारी पुरुष मान्य करील. प्राथमिक शाळांतून अगर अतज्ज्ञ श्रोत्यांकरता अथवा वाचकांकरता शुद्ध मराठी शब्द वापरण्यास, अगर त्याच्या मदतीने स्पष्टीकरण करण्यास, कोणाचीच हरकत नाही. पाश्चात्य देशांतहि ही पद्धति स्वीकारली जाते. "जबड्याचें हाड", "डोक्याची कवटी", "ठिणगी", व इतर अनेक शब्द अशा रीतीने मराठींत वापरले जातील व जावे; पण त्यांना पारिभाषिक असे वेगळे शब्द ( मराठी, हिंदी, कानडी इत्यादि सर्व भाषांत एकच ) राहणें जरूर आहे.

(२) नवीन शब्द बनवतांना एक एक वेगळा शब्द घेऊन त्याला प्रतिशब्द द्यावयाचा की त्या शब्दांतील घटकावयव असणारे सर्व शब्द प्रथम एकत्र घेऊन नंतर त्या सर्वांना प्रतिशब्द देतां येतील अशा रीतीने एकंदर योजना करावयाची ? उदाहरणार्थ, Benzene ह्या शब्दाला प्रतिशब्द योजतांना Benz + ene अशी त्याची फोड करावी लागते कारण -ene हा प्रत्यय अनेक इतर शब्दांतहि येतो. तसेंच Benz- ह्या भागाला जो "धूप" हा प्रतिशब्द दिलेला आहे त्यापासून जे Benzyl (धूपल), Benzoyl (धूपूल), Benzoylation (धूपूलन), Benzoylated(धूपूलित), असे निरनिराळे शब्द बनतात, त्यांनाहि ( उदाहरणार्थ कंसांतील) प्रतिशब्द देतां यावे अशी योजना पाहिजे. एखाद्या शास्त्रज्ञाला नवीन शब्द बनवण्याचा प्रसंग आला तर त्याला तो सर्वसाधारण तत्त्वांनुसार बनवतां आला पाहिजे व तो इतर शास्त्रज्ञांना कळला पाहिजे. आता Electron ह्या शब्दाशीं संबंध असलेले अनेक शब्द, उदाहरणार्थ Electricity, Electrolysis, Electrolyte, Electrovalency, Electrode, Electronics, Electro-statics, Electro-phorus इ० इ० आहेत व नवे तयार होतील. वीज हा शब्द Electricity ह्या शब्दाला प्रतिशब्द म्हणून वापरल्यास ह्या सर्व शब्दांना प्रतिशब्द योजणें कठीण जाईल. उलट विद्युत् हा शब्द उपयोजिल्यास विद्युदग्र, विद्युद्विश्लेषण, विद्युदणु, विद्युत्संयुजता असे समजण्यास सोपे असे शब्द बनतात.

(३) परिभाषा ठरवितांना होतां होई तों निरनिराळ्या शास्त्रांत देखील एकाच शब्दाचे भिन्न अर्थ होऊं नयेत अशी काळजी घेणें जरूर आहे. "गर्भ" शब्दाला जीवशास्त्रांत विशिष्ट अर्थ आहे, तेव्हा परमाणुसंरचनेंत तो शब्द वापरणें इष्ट नाही असें मला वाटतें. त्याऐवजी न्यष्टि ( अष्टि = आठळी, kernel ) हा आचार्य रघुवीरांचा शब्द अधिक चांगला वाटतो. त्यांतूनहि गर्भ किंवा गाभा ह्याचा सर्वसाधारण व्यावहारिक अर्थ "आंतील भाग" असा आहे. परमाणूच्या केंद्रस्थानीं धनविद्युत्प्रभारित न्यष्टि व तीभोवतीं निरनिराळ्या कक्षांतून फिरणारे विद्युदणु असल्यामुळे "गर्भ" ह्या शब्दाने एखादे वेळीं फक्त न्यष्टि किंवा एखादे वेळीं न्यष्टि व सर्वांत बाहेरची सोडून इतर कक्षांतील विद्युदणु ह्या सर्व संरचनेचा बोध होईल. परमाणूचा भौतिक व रासायनिक दृष्ट्या विचार करतांना हा भेद करावा लागतो. तरी "गर्भ" शब्द टाळावा असें माझें मत आहे.

(४) Atom म्हणजे मूलतत्त्वाचा सर्वांत सूक्ष्म कण म्हणून त्याला "परमाणु" म्हणावें, "अणु" म्हणूं नये, असें माझें मत आहे, व त्याबद्दल, तसेंच "अणुध्वंस" ऐवजीं "परमाणु-प्रस्फोट" हा शब्द वापरावा ( त्यापासून -प्रस्फोटन,-प्रस्फोटक इत्यादि साधितें सहज बनतात ) ह्याबद्दल मी "वाङ्मयशोभा" मासिकाच्या ऑगस्ट १९४७ च्या अंकांत स्पष्टीकरण केलेलेंच आहे. त्याबद्दल येथे जास्त विस्तार करण्याचें कारण नाही.

(५) प्रा. आपट्यांनी सुचविलेल्या सर्व शब्दांचा तौलनिक विचार करून जास्त जागा अडविण्याची माझी इच्छा नाही. कांही सर्वसाधारण मुद्दे व शिकतांना आणि शिकवितांना येणाऱ्या कांही अडचणींचा विचार करून सुचलेले कांही प्रश्न यांचाच फक्त निर्देश केलेला आहे. आल्फा, बीटा, गामा यांना अ, आ, इ कां म्हणूं नये, अ, ब, ग कां म्हणावें, तें कळत नाही. आल्फा, बीटा, गामा, हा एका परकी भाषेंतील वर्णानुक्रम आहे त्याला अ, ब, ग अशीं नावें देण्याचें प्रयोजन दिसत नाही. असो.

आपला

**दि. धों. कर्वे**

# ही तुझीच इच्छा बलीयसी* !

—'की प्रलय कालचे बारा जणुं आदित्य
उगवतील वाटे विश्वावरती तप्त !
अन् करतिल त्याची मूठभरी कां राख ?
हा आज खरोखर विश्वा पडला धाक ! १
माजरी गमसि तूं, मूषक आम्ही सारे
तव भक्ष्य होउनी फिरताहोंत बिचारे !
कटु हाल आमचे करुनी वर हंसतोस
दुःखांत आमुच्या तुझा असे संतोष ! २
एकास निर्मिलें भक्ष्य दुजाचें व्हाया
व्याघ्रास निर्मिलें धेनूला भक्षाया !
निर्मिलें दुर्जना सज्जनास ग्रासाया
ही हिंसक वृत्ती जगतीं दिसते साऱ्या ! ३
कां कामवासना दुर्दम्यच निर्मीसी ?
अनिवार वृत्ति कां लोभाची ही सृजिशी ?
क्रोधास चालना मनुजा हृदयीं देसी !
कां आम्हांकडुनी दुष्कृत्यें करवीसी ? ४
हा खेळ तुझा परि जातो अमुचा जीव
उपजे न कांहि कां तुझ्या अंतरीं कीव ?
ही तुझीच करणी कोण तिला अडवील ?
तूं बळी म्हणुनियाँ होसी कर्दनकाळ ! ५
काम-लोभ यांचा करशि न कां संहार
दुःखाचें मूळच कां न छेदिशी पार ?
ही तुझीच इच्छा बलीयसी मज गमतें
"कीं दुःख जगावर रहावेच नांदतें ! ! ६
जर तुझीच इच्छा — दुर्जन पालटतील
जर तुझीच इच्छा — दुःखोदधि आटेल !
जर तुझी सदिच्छा झाली — एक क्षणांत
नरकाचा होइल त्याच क्षणिं या अंत ! ! ७

नारायण नागोराव हूड, बी.ए.,एल्.एल्.बी.

* "निराभास" या आगामी काव्यसंग्रहांतून.

संक्षिप्त परीक्षण

## मराठी व्युत्पत्तिकोश :

लेे० श्री. गोविंद कृष्ण मोडक

### पूर्वार्ध

१. प्रास्ताविक— प्रा० कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, एम्.ए., बी.टी., यांनी जो हा ग्रंथ लिहिला आहे त्यांत त्यांनी ऐतिहासिक व तौलनिक दृष्ट्या मराठींतील शब्दांचें मूळ देण्याचा प्रयत्न केला आहे. या प्रयत्नाचें मी मनापासून अभिनंदन करितों. कारण यासारखे ग्रंथ मराठींत फार थोडे लिहिले जातात. श्री. कुलकर्णी यांचा मराठी भाषेचा व्यासंग दीर्घ-कालीन आणि दांडगा आहे; व यामुळे असा ग्रंथ लिहिण्याची त्यांची पात्रता कोणीहि मान्य करील. हा ग्रंथ लिहिण्याची सुपारीहि प्रत्यक्ष मराठी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांच्या हातून त्यांस देवविण्यांत आल्याने हा त्यांचा अधिकार सर्वसंमत गणला गेला आहे; व अर्थात् यामुळे या ग्रंथाचें प्रामाण्य विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमांत व परीक्षांत स्वीकारिलें जाणार, हेंहि उघड आहे. हें या ग्रंथाचें दूरगामी महत्त्व लक्षांत घेतां हा ग्रंथ यावच्छक्य निर्दोष असावा, असें कोणीहि अपेक्षील. ही अपेक्षा कितपत सफल झाली आहे हें पाहण्यासाठी या ग्रंथाचें परीक्षण करीत आहें. त्यापासून विद्वानांस ग्रंथाच्या योग्यतेचें मापन करण्यास साधन मिळेल.

या ग्रंथाची प्रस्तावना एकशेवीस पृष्ठें व्यापणारी म्हणजे बरीच विस्तृत आहे; आणि प्रत्यक्ष कोशाचीं पृष्ठें ७८० आहेत. या ग्रंथाचे प्रस्तावना व कोश असे दोन भाग आहेत. पैकी प्रथम प्रस्तावनेचें परीक्षण करितों.

२. कोशाचें स्वरूप—व्युत्पत्तिकोशाचें स्वरूप कसें असावें, हें लेखकाने प्रस्तावनेंत उत्तम विशद केलें आहे. श्री. कुलकर्णी यांचें वाचन विस्तृत व साधनेंहि विपुल; यामुळे त्यांनी अनेक इंग्रजी ग्रंथांच्या वाचनाने व्युत्पत्तिकोश कसा असावा, हें निश्चित करून तदनुरूप हा ग्रंथ उतरविण्याचा प्रयत्न केला आहे. कोशाच्या अशा या स्वरूपाची चर्चा पृ० १८-२२ मध्ये त्यांनी दिली आहे. ती वाचकांनी मुळांतच पाहण्यासारखी आहे. या स्वरूपाचे आदर्शा-नुसार प्रस्तुत कोशांत ( पृ. १८-१९ ) त्यांनी पाश्चात्य भाषा, शिमी भाषा, भरतखंडांतील आर्यपूर्व लोकांच्या भाषा व वर्तमान मराठीच्या भाषाभगिनी, यांतील सगोत्र व सदृश शब्द मराठी शब्दांच्या व्युत्पादनास उपयुक्त म्हणून पदोपदीं दिले आहेत. त्यामुळे वाचकास कोणतीहि व्युत्पत्ति ग्राह्य वा अग्राह्य, व तशी ती किती प्रमाणांत मानावी, हें ठरविण्यास साधन उपलब्ध झालें आहे. हें कोशाचें तौलनिक स्वरूप होय. याबरोबरच ( पृ. १८ ) ऐतिहासिक रूपहि दाखविण्यांत आलें आहे. पाश्चात्य विद्वानांनी संस्कृत भाषा व तिच्या बहिणी लातिन, ग्रीक इ० भाषा या सर्वांची जननी म्हणून एक संस्कृतपूर्व भाषा कल्पिली आहे. या संस्कृतपूर्व भाषे-पासून संस्कृताचे द्वारा पाली, महाराष्ट्री इत्यादि मध्यगत भाषांतून कोणकोणतीं रूपान्तरें व अर्थान्तरें अनुभवीत मराठींत शब्द आले, हें परिश्रमपूर्वक सांगण्यांत आलें आहे. या दुहेरी अंगामुळे कोशगत शब्दांचीं देशगत व कालगत रूपें वाचकांस ज्ञात होतील. तसेंच, त्याचे

भाषाज्ञानांत भर पडून शब्दाची पूर्वपीठिका त्यास कळेल व तदनुसार त्याचा सम्यक् उपयोग करण्याची पात्रता त्यास येईल. हीं कोशाचीं दोन्ही अंगें विद्यार्थ्यास अभ्यासाई आहेत.

३. **व्युत्पत्तीचा व्यावहारिक उपयोग**–कांही लोक व्युत्पत्तीचें वरील महत्त्व मानण्यास सिद्ध होत नाहीत. त्यांनी लेखकाचें पुढील व्युत्पत्तिज्ञानाचें समर्थन ( पृ. २२–२४ ) अवश्य वाचावें. व्यवहारांत भाषा योजणें अवश्य. भाषा म्हणजे शब्दांचा समूह. विविध कार्याचा बोध शब्दच करणार. शब्द जितका समर्पक व निश्चित अर्थाचा द्योतक असेल, तितका हा बोध समीचीन होणार, हें ओघानेच प्राप्त होतें. हें निश्चितार्थाचें ज्ञान व्युत्पत्तीपासून मिळतें. तेव्हां 'कोणता शब्द कोठे योजावा ?' याचें मार्गदर्शन करून व्युत्पत्ति व्यवहारास उपकारक होते. करितां तिचा अभ्यास उपयुक्त आहे. हें लेखकाचें समर्थन सर्वथा योग्य असेंच आहे.

यापुढे (पृ.२५–३०) आपल्याकडील संस्कृत व प्राकृत शब्दांच्या व्युत्पादनप्रयत्नांची माहिती आली आहे. तींत वर्णलोपादि विविध संज्ञा आल्या आहेत. पुढे ( पृ. ३०–५६ ) मनुष्याला बोलण्याचें सामर्थ्य कसें आलें असावें, तत्पूर्वी तो आपलें मनोगत दुसऱ्यास कसें कळवीत असावा, शब्दापासून विधान करण्याची शक्ति वाक्यास कशी येते, इत्यादि सूक्ष्म तात्त्विक गोष्टींची चर्चा आली आहे. ती तज्ज्ञांस उपयुक्त वाटेल. ५७–६७ या पृष्ठांत विविध आर्यभाषा, त्याचे कालखंड, व त्यांतील नानाविध वर्णोच्चार चर्चिले आहेत. पृ. ६७–७५ मध्ये मराठी शब्दांतील विविध वर्ण,–स्वर व व्यंजनें– कोणकोणत्या संस्कृत शब्दांतील वर्णांपासून कसे सिद्ध होतात, हें सोदाहरण दाखविलें आहे. पृ. ७५–७७ यांत शब्दान्तर्गत वर्णविकार सांगितले आहेत. ७८–८३ या पृष्ठांचा विषय संख्यावाचक शब्द व पृ. ८३–८४ यांचा विषय सर्वनामें, हा आहे. पृ.८७–८८ मध्ये तत्सम, तद्भव व विविध देशज शब्द वर्णिले आहेत. ८९–१०४ या पृष्ठांत भाषेचे अष्टविध शब्द-घटक सांगितले आहेत. त्यांत शब्दांतील साम्य, देवाण-घेवाण, त्यांचे मराठींत येण्याचे काल, या प्रवासांत त्यांच्या अर्थांत होणारे बदल इत्यादि विषय हाताळले आहेत. पृ. ११४–१२० यांत शब्दांतील आभ्यन्तर विकार, त्यांची आरंभीं होणारी वाढ, अंतीं होणारी वाढ, दोन शब्दांचा संयोग व शब्दांची पुनरुक्ति या पांच प्रकारांनी शब्दांची बनावट विशद केली आहे.

या प्रस्तावनेंत पृ. ६७–८४ यांमध्ये केलेली चर्चा हा व्युत्पत्तीच्या 'रूपविकार' या एका प्रधान अंगाचा खास गाभा आहे. कारण यांत तद्भवांतील वर्ण यथाक्रम संस्कृतांतील कोण-कोणत्या वर्णांपासून येतात, हें दिलें आहे. हाच प्रस्तावनेचा भाग प्रायः पुढील लिखिताचें लक्ष्य आहे.

४. **विवेचन**–विवेचनाच्या विचारामध्ये त्याची भाषा, त्यांतील अनुमानें, तीं काढितांना अवलंबिलेला तर्क, त्यांतील भावनेचें किंवा श्रद्धेचें मिश्रण, इत्यादि गोष्टी येतात. पैकी प्रस्तुत लेखकाची भाषा ओघवती, आकर्षक, प्रभावी व आपलें प्रमेय वाचकाच्या गळीं उतरविणारी अशी आहे. विशेषतः पृ. १११ वर जुन्या शब्दांची जी वकिली लेखकाने केली आहे तिची भाषा सर्वथा आदर्शभूत आहे. अर्थात् ती आपल्या म्हणण्यासंबंधी वाचकांची खात्री पटविते, हें सांगणें नकोच. ही वकिली फिरफिरून वाचावीसें वाटतें; व या संबंधांत सहजच पुढील उद्गार तोंडून निघतो—

व्याख्याने लौकिकार्थस्य कृष्णराजो विशिष्यते ॥

सारांश—लौकिक विषय सजविण्याच्या लेखकाच्या चातुरीबद्दल कोणीहि त्याचें अभिनंदन करील.

५. सदोष तर्कपद्धति—विवेचनानंतर प्रस्तावनेंत मधून-मधून दिलेल्या वर्णविषयक नियमांकडे वळूं. यांतील बहुतेक नियम फुटकळ आहेत. सर्वंकष (नियम =) उत्सर्ग असा विरळा. 'शब्दांतील उपान्त्य वर्ण जोराने उच्चारिला गेल्यामुळे त्यांतील स्वर दीर्घ होतो; व त्यामुळे अन्त्य स्वर लोपतो; जसें—तीळ, गूळ, इ०' (पृ. ६६) या नियमाचा येथे विचार करूं. येथे वस्तु-स्थिति पाहूं जातां सर्वस्वीं उलट आहे. अन्त्य स्वर लोपतो तो उपान्त्याच्या दीर्घत्वामुळे नव्हे; उलट, अन्त्याच्या लोपामुळे उपान्त्य स्वराला दीर्घत्व येतें. मराठी भाषेला ( जोडाक्षरांत नसलेला ) शेवटला अ-कार खाण्याची फार पुरातन खोड आहे. ज्ञानेश्वरकालीं '( आम्ही ) जाऊन' च्या जोडीला '(आम्ही) (जाऊन =) जाऊं' असाहि प्रयोग रूढ होता. उत्तरकालीं प्रायः 'जाऊं' असा एकटाच राहिला. यावरून 'जाऊन' हें पूर्वीचें रूप आणि 'जाऊं' हें नंतरचें रूप ठरतें. 'जाऊन'-मधील अन्त्य अ कार भाषेने खाल्ला; यामुळेच 'जाऊं' हें रूप झालें, हें उघड आहे. यावरून शब्दाचा अन्त्य अ-कार गाळण्याची मराठीची प्रवृत्ति स्पष्ट दिसते. रामेण → रामेण् → रामें ही परंपरासुद्धा असाच अ-कारलोप दर्शविते. तन, मन, धन यांचा कानोसा घेतला तर अन्तीं न् ऐकूं येतो, व त्यावरून अन्त्य अ गळतो हेंच सिद्ध होतें. एवढेंच नव्हे; या अन्त्य अ-काराच्या पाठोपाठ अन्ताहून इतरत्र असलेलाहि अ-कार गळूं लागला. लवकर यांतील दुसरा अ-कार आपल्या उच्चारण्यांत येत नाही; तो लोपतो. या लोपास कारण उपान्तगत इ किंवा उ आहे, असें मुळीच दाखवितां येणार नाही. यावरून अन्त्य अ-कारापुरता विचार केल्यास असें दिसतें की—मराठी शब्दाचा अन्त्य अ-कार (त्याचे पूर्वी संयोग नसल्यास) उच्चारांतून गळतो; व त्यामुळे स्वररहित झालेल्या तत्पूर्वव्यंजनाच्या उच्चारासाठी उपान्तगत स्वर ताणला जाऊन दीर्घ होतो. अर्थात् येथे अन्त्य अ-कारलोप हें कारण व उपान्त्य स्वराची दीर्घता हें कार्य होय. कीर्त-मध्ये, तूर्त-मध्ये उपान्त्य स्वर दीर्घ असूनहि अन्त्य अ-कार लोपत नाही. या सर्व विचारावरून या ग्रन्थांतील नियम चूक ठरतो. अर्थात् नियमांतील तर्कपद्धति सदोष आहे.

६. भ्रान्त अनुमान—'अर्धस्वरांपासून अ, इ, उ, ऋ हे स्वर निघाले असावे.' ( कोश-पृष्ठ १ ) या अनुमानास 'हयवरट्' आणि 'इग्यणः संप्रसारणम्' हीं दोन सूत्रें आधार आहेत. येथे मी एवढेंच विचारितों की, याच न्यायाने 'इको यणचि' या सूत्राने उलट अनुमान कां काढूं नये? या उलट-सुलट अनुमानांचा अन्योन्यनिरास होऊन शेष काय उरणार? सारांश—वरील अनुमान व सूत्रें यांचा परस्परांशीं कांहीच संबंध नाही. अर्थात् या सूत्रांपासून वरील अनुमान मुळी काढतांच येत नाही.

७. विचारांतील ढिलाई—ही पदोपदीं आढळून येते. उपाध्याय ( पृ. २६ ) या शब्दाची व्युत्पत्ति उप + अधि + इ + ( प्रत्यय ) अ अशी न देतां, उप + आ + ध्यै अशी दिली आहे. ही नजरचूकहि म्हणतां येत नाही. कारण पुढच्याच पृ. २७-च्या अन्तीं ध्यै हाच धातु सांगितला आहे. कोशामध्येहि ओझा या शब्दाखाली ध्यै हाच धातु दिला आहे; आणि येथे चुकीच्या एका धातूच्या मरतीला अधि + ई असा दुसरा धातु दिला आहे. यांतील धातूच्या दीर्घत्वाने पूर्वीची चूक दुरुस्त न होतां तींत मरच पडली आहे. उपाध्याय-च्या घटनेंत ध्यै-चा संबंध मुळीच नाही. संस्कृत वाङ्मय सांगतें, ' उपेत्याधीयते यस्मात् स उपाध्याय उच्यते । ' अर्थ—ज्याजवळ जाऊन ( अधि + इ = ) शिकावयाचें, तो उपाध्याय. यांत 'ध्यान करणें' एतदर्थक धातु ध्यै मुळीच संभवत नाही. अर्थात् ही 'उपाध्याय' या शब्दाची फोड लेखकाच्या विचारसरणींतील ढिलाईच व्यक्त करिते.

८. **श्रद्धावशता**—ही ग्रन्थांत मधून-मधून भरपूर दिसून येते. "इ या स्वरामध्ये कोमलता, गमन, मार्दव, स्त्रीत्व इत्यादि अर्थ आहेत. तसेंच ग् या ध्वनीचे अर्थ गाणें, शब्द करणें, घेणें, बांधणें, रचणें, गिळणें, जाणें, पाळणें, लपविणें इत्यादि आहेत." (पृ. ३८) हे वर्णांचे अर्थ ज्याला पटतील त्याने स्वीकारावे. हे अर्थ वेळेस ठरलेच तर ते वर्णांनें आरंभ पावणाऱ्या धातूचे ठरतील, नुसत्या वर्णांचे ठरणार नाहीत. एतदनुरूप हे अर्थ यथाक्रम गै, गुञ्ज्, ग्रह्, गुम्फ्, ग्रन्थ्, गॄ, गम्, गुप्, गुह्, इत्यादि धातूंत सांपडतील. पण या अर्थां-बरोबर इतरहि अर्थ ग्-आदि धातु व्यक्तवितात. शिवाय कूज् ( गाणें ), रु (शब्द करणें), ला ( घेणें ), बन्ध् ( बांधणें ), या ( जाणें ), पा ( पाळणें ), ह्नु ( लपविणें ) इत्यादि धातूंत आरंभीं ग्-हून भिन्न अशीं निरनिराळीं व्यंजनें असतांहि हे अर्थ दिसून येतात. यावरून अन्वयव्यतिरेकांनी सिद्ध होतें की, हे अर्थ एखाद्या विशिष्ट वर्णावर किंवा तदारब्ध धातूवरहि लादणें म्हणजे केवळ अन्धश्रद्धा होय.

९. **कच्चा आत्मविश्वास**—लेखकाच्या विचारसरणींत आत्मविश्वास वारंवार पुरेसा दिसून येत नाहीं. लेखक विचार करीत-करीत अनेक वेळां साध्याच्या जवळ जवळ येतो; पण साध्याला हात घालावयाच्या ऐन वेळीं त्याचें मन कच खातें. ( क ) **श्लक्ष्ण**>लहान-सहान ( पृ. ६२७ ), **स्वैरम्**>सैरावैरा ( पृ. ७५२), अशा सर्वथा सत्य असलेल्या व्युत्पत्ति लेख-काने दिल्या आहेत; पण त्यांतील व्युत्पाद्य शब्दाच्या उत्तरार्धानें त्यास बुचकळ्यांत टाकिलें आहे. येथे आद्य संयोग श्ल हा विश्लेष पावला आहे. त्याचे घटक तद्भवाच्या दोन दलांच्या आरंभीं, श् सहान-मध्ये, आणि ल् लहान-मध्ये, आले आहेत. स्वैर-चे स् आणि व् क्रमाने सैरा आणि वैरा यांच्या आरंभीं आहेत. **प्राघुणक**>पाहुणा-राहुणा या तद्भवांतहि हाच प्रकार. येथे असा स्पष्ट नियमच दिसतो की, कधी-कधी शब्दाच्या आद्य संयोगाचे घटक त्या-पासून निघालेल्या द्विरुक्ति-विशिष्ट तद्भवामध्ये दोन भागांच्या आरंभीं वांटून दिले जातात. या वस्तुस्थितीची अंधूक कल्पना लेखकास आलेली दिसते; पण आत्मविश्वासाभावीं साक्षात् वरील नियम बसविण्याचें धैर्य त्यास झालेलें दिसत नाहीं. ( ख ) **शाहणा** या शब्दाच्या व्युत्पत्तीचाहि हाच प्रकार. दिवंगत राजवाडे यांनी शिक्षाज्ञ आणि विचक्षण अशीं या शब्दाचीं दोन मुळें दिलीं आहेत. त्या दडपणामुळे, किंवा कारणान्तरामुळे म्हणा, या शब्दाची यथार्थ व्युत्पत्ति **सज्ञान>सन्यान>सयाना>सायना>शाहणा** अशी देण्याचें धारिष्ट त्यास झालें नाहीं; मात्र तशी शंका त्याने प्रकटिली आहे. ( ग ) **विंशति, त्रिंशत्** ( पृ. ८३ ) इत्यादि दहा-च्या पटींचे शब्द व्युत्पादण्यांत हा प्रकार विशेषच प्रकट होतो. हे शब्द समास असावे, असा यथार्थ बोध तर लेखकास होतो; पण तो सिद्धान्त म्हणून मांडण्यास पुरेसा धीर त्यास होत नाहीं. येथे पुढील वस्तुस्थिति आहे—दशत्, दशति असे शब्द दश-चे पर्याय आहेत. यांतील दशति हा पर्याय ति अशा संक्षिप्ततम रूपानेंहि आढळतो. हेच शब्द द्वि इत्यादि संख्यांना जोडून दहा-च्या पटींचे शब्द बनविण्यांत आले आहेत. द्वि + **दशति**=विंशति, चतुर् + **दशत्**=चत्वारिंशत्, षप् + ति = षष्टि,—इत्यादि. हे सगळे शब्द अशा प्रकारें समास आहेत. येथे **शंका**—शत् व शति यांचे पूर्वीचा द कोठे गेला ? **उत्तर**--त्रेचाळ यात आपण चाळीस-चा संक्षेप करतों ना ! **एक्याण्णव** यांत नवति-चा संक्षेप नव असा होतो. हे सामासिक शब्द सांगतात की, संख्याचे समास बनतांना ( हे समास वारंवार बोल-ण्यांत यावयाचे असल्याने यावच्छक्य लहान असावे या अपेक्षेनुसार ) त्यांतील घटकांना संक्षिप्त रूप येतें. या तत्त्वानुसार दहाचे बोधक असलेले दशति आणि दशत् हे शब्द द-चा

लोप करून समासांत शिरतात. पैकी शति अधिक संक्षेप पावून नुसता ति असाहि आढळतो. वीस, तीस, इत्यादि शब्दांच्या इंग्रजी पर्यायांतहि ( टि किंवा ) ति याच शब्दाने दहाचा बोध होतो. या सर्व विचारावरून छातीठोकपणें असें सांगतां येतें की, विंशति इत्यादि शब्द उघड उघड मूळचे विधिवत् समास आहेत. या त्यांच्या घटनेचा अर्थाशींहि सर्वस्वीं मेळ आहे. ही गोष्ट लेखकाच्या कल्पनेला गोचर झालेली स्पष्ट दिसते; कारण 'शति, शत्, ति, हे अवयव दहा या अर्थी आहेत कीं काय ?' (पृ. ८३) असें लेखक विचारितो. 'सर्वथा आहेत.' हेंच याचें उत्तर. पण या सत्यास मुठींत कवळतांना त्याच्या भित्र्या मनाने त्यास कच खावयास लाविलें आहे. यावरून लेखकाची कल्पनाशक्ति उज्ज्वल पण धीर कचा दिसून येतो.

१०. अपविधानांचा सुळसुळाट—( क ) 'मराठींत चमचा, चोंच यांतल्याप्रमाणे दन्त्य-तालव्य उच्चार आले ते चिनी प्रवाशांच्या संसर्गाने.' ( पृ. ६२ ) असें लेखक कल्पितात. पण परदेशस्थ प्रवाशांच्या तुटपुंजा संसर्गाने तद्देशस्थ लोकांच्या वर्णोच्चारांत बदल कधीच संभवत नाही. ( ख ) 'ज्ञ—चा उच्चार संस्कृतांतून मराठींत जशाचा तसा आला आहे.' ( पृ. ६३ ). हें म्हणणें चूक आहे. कारण ज्ञ्-चे संस्कृतांत ज् ञ् हे घटक आहेत; तर मराठींत द् न् य् असे आहेत. ( ग ) 'च्-ज्-योः उपरि यः भवेत्, याचा अर्थ ( माझ्या मतें ) असा की, "च् ज् या व्यंजनांनंतर य् उच्चारला जावा." येथे च्—चें संस्कृतांतील तालव्य उच्चारण विहित दिसतें. उपरि—चा अर्थ 'वर', 'नंतर' असाच आहे; 'पूर्वी' असा नाही. असें असून या वचनाच्या खुलाशांत ग्वलङ् घिजलङ्, असें लेखक लिहितात. (पृ. ६२ ) यांत य् च्—च्या पूर्वी कां ? येथे वचन व खुलासा यांत मेळ नाही.

११. अनवधानदोष—हे ग्रंथांत जिकडे-तिकडे आढळतात. 'बापाचें नांव पिते म्हणून न लिहिता बिन म्हणून लिहूं लागले.' (पृ. १०३ ) यावरून सरळ अनुमान संभवतें कीं, बिन = पिते = बाप. पण वस्तुतः बिन = पुत्र. "सुखं च मे शयनं च मे" (पृ. १०६) यांत 'सुखं' चे स्थानीं 'सुगं' पाहिजे. 'चमे'—च्या जोडीला लेखक 'नमे' असें देतात. (पृ. १०८ ) पण या रूपाची येथे प्राप्तिच नाही. कारण ( नमः→ ) नमो हें रूप प्राप्त होतें, व तेंच 'चमे' प्रमाणे वारंवार आढळतेंहि. पृ. १०७ येथे लेखक म्हणतात की, उपेन्द्रवज्रा हा शब्द दुतोंडी (शब्दद्वय-अंश-घटित) आहे. पण तशा कल्पनेस येथे सवड नाही. उपेन्द्रवज्रा हा शब्द उपजाति व इंद्रवज्रा या दोन शब्दांचा संक्षेप नसून ( एकाचें तोंड व एकाचें शेपूट या भेक + मंडूक = बेडूक-प्रमाणे बनलेला नसून ) उपगता + इन्द्रवज्रा ( = इन्द्रवज्रेचीच बहीण ) या दोन शब्दांचा समास आहे; व त्याने एका स्वतंत्र वृत्ताचा बोध होतो. तें मिश्रवृत्त नाही. मिश्रवृत्त येथे संभवेल तें उपजाति होय. पण त्याचीहि संज्ञा दोन शब्दांच्या तोंड—शेपटांनी बनलेली नाही.

१२. परधार्जिणेपणा—काढणें आणि दिसणें यांचीं मुळें कृष् आणि दृश् अशीं संस्कृतांत स्पष्ट सांपडत असतां व आजपर्यंत तीं सर्वसंमतहि असतां, लेखकाने त्यांचे स्थानीं क्रमाने 'कर्ध् आणि डर्क् अशीं इंडो-युरोपियन मुळें असावीं' (पृ. ९८) असें म्हटलें आहे. पण ( क ) कृष्ट आणि काढ यांचा अर्थतः मेळ आहे, तसा रूपतःसुद्धा आहे. कृष्ट → काठ → काढ हें सरळ ओघाने प्राप्त होतें. ठ → ढ हा विकार पाठ → पाठक → पाढा, दंष्ट्रा → दाढ,--या उदाहरणांनी समर्थित होतो. अशा रीतीने कृष्-चें भूतविशेषण कृष्ट > काढ हें व्युत्पादन अर्थतः व रूपतः निरपवाद ठरतें. ( ख ) दृश् > दिस—णें ही व्युत्पत्तिसुद्धा आक्षेपरहित आहे. कृष् > ( खोबरें ) 'किसणें' याप्रमाणे, दृश्-वरून 'दिसणें'

आलें आहे. तेव्हा प्रश्न असा की, हीं दोन्ही संस्कृतागत मुळें सर्वथा उपपन्न असतां, लेखकाचा परभाषेतील मुळांकडे ओढा कां असावा? असा ओढा निषेधार्ह आहे. येथील सत्य पाहतां दंश् > डंख, दश् > देख, यांच्या साम्याने दश् > डर्क असाच ओघ दिसतो. पण लेखक उलट ओघ कल्पितो. हाच परघार्जिणेपणा ( अक्षय–तृतीया → अख + तीज → ) अकीत या शब्दाच्या, उत्तरेंतील मासगणनेस अनुसरून, लेखकाने दिलेल्या **अष्टदश** (कोश-पृष्ठ ९) या मुळांत दिसून येतो. पण रूपविकारदृष्ट्या 'अष्टदश' व 'अखतीज' यांतून 'अखतीज' हेंच अकीत-चें मूळ म्हणून कोणीहि मान्य करील.

१३. **तत्त्वविमुखता**––६७–७५ या आठ–नऊ पृष्ठांत कोणकोणते वर्ण कोण-कोणत्या संस्कृत शब्दाच्या वर्णांपासून, नियमाने किंवा क्वचित्, तद्भवांत येतात, हें सांगितलें आहे. पण ही सर्व माहिती केवळ ( यादीच्या अथवा ) साखळीच्या रूपाची आहे. संस्कृतांतील वर्ण कोणत्या तत्त्वानुसार बदलून तद्भवांत येतात, एतद्विषयक नियम, निदान स्थूल नियम तरी, मुळीच सांगितले नाहीत. एवढेंच नव्हे, या बदलाच्या मुळाशीं असलेलीं नुसतीं तत्त्वेंसुद्धा दिलीं नाहीत. बरें, हे विकार नियमक्षम नाहीत, असेंहि नाही. या बदलांत निश्चित तत्त्वें प्रायः स्पष्ट दिसून येतात. हीं तत्त्वें व तदाश्रित नियम यांची अपेक्षा प्रा० कुलकर्णी यांच्यासारख्या अधिकारी पुरुषास सोडून दुसऱ्या कोणाकडून बरें वाचक करणार! वाचकांच्या सोयीसाठी हीं तत्त्वें व नियम देण्याचा मी येथे यत्न करितों.

१४. **संयोग-विकार**–संयोगयुक्त शब्द मराठींत येतांना कोणते विकार पावतात, एतःसंबंधी लक्षणीय गोष्टी : (क) व्यंजनांचे गट चार पडतात– (१) (क्-पासून म्-पर्यंतच्या पांच वर्गांतील पहिलीं चार व्यंजनें = ) नस्येतर **स्पर्श**, (२) ( **पञ्चमव्यंजनें** = ) **नस्य-वर्ण**, (३) ( शृषस्ह् = ) ऊष्म-वर्ग आणि (४) ( य्र्ल्व् = ) **अर्धस्वर**. ( ख ) (१) या गटांपैकी पूर्व-पूर्वगटातील वर्णांशीं उत्तरोत्तर गटांतील वर्ण संयुक्त असल्यास, तो ( उत्तरोत्तर गटांतील वर्ण ) लोपतो. ( २ ) या वर्णलोपाबरोबरच मागील स्वर-ह्रस्व असल्यास प्रायः दीर्घ होतो, आणि क्वचित् शेष वर्णाचा द्वित्वसंयोग होतो. ( ३ ) संयोगाचे घटक एकाच गटांतील असल्यास त्यांतील पूर्वघटक गळतो. ( ४ ) र्-चा लोप प्रायः सर्व संयोगांतून होतो. (५) ल् ह यांचे विकार प्रायः स्वैर होत असल्याने वरील तत्त्वानुसार होणारे त्यांचे विकार प्रमाण मानूं नयेत.

वरील तत्त्वांनुसार बदल पावणाऱ्या संयोगांचीं उदाहरणें पाहा. संयोगाचे घटक––

[१]( १ ) **स्पर्श** आणि **नस्य** (क) अयत्न → आयता, आत्मन् → अत्ता (→अप्पा),
सिध्मन् → शिंबें ( ख ) [स्यन्दनं > सांडणें, बन्धक > बांधा], वंशक > वॉंसा,
शृङ्खला > सॉंखळी, दन्त > दॉंत.

[२]( २ ) **स्पर्श** आणि **ऊष्मन्** ( क ) रक्षा → राख, गुत्स → गुच्छ.
( ख ) पुष्करिणी → पोखरण,
स्थालीपिष्ट → थालपीठ,
पश्चात् → पिच्छा.

( १ ) संयोगांतून नस्य साक्षात् गळाला तरी त्याच्या केवळ संस्कारशेषामुळें पूर्वस्वर अनुनासिक होतो; जसें-ग्रन्थि > गांठ, कम्प > कांप, दंश > डास.



अनुक्रमणिका

( ३ ) स्पर्श + अर्धस्वर--योग्य → जोगा, व्याघ्र → वाघ,
वप्र → वाप ( → बाप ),
वल्गुल → वाघूळ,
पक्व → पिका.

( ४ ) नस्य+ अर्धस्वर-- अन्य → आन, आम्र → अंबा.

[२]( ५ )ऊष्मवर्ण+नस्य-- उष्ण →उन्ह, ( उन्ह-ची सप्तमी ) उन्हांत.
प्रस्नव > पान्हा.

( ६ ) ऊष्मवर्ण+अर्धस्वर— श्वशुर > सासरा, कांस्य > कांसें.

( ७ ) एकाच गटांतील व्यंजनें--
( क ) रिक्त > रिता, मुद्ग > मूग, सप्त > सात.
( ख ) चर्व् > चाव, कार्य > काज, मूल्य > मोल.

( ८ ) र् व इतर व्यंजनें--चक्र > चाक, निद्रा > नीद,
व्रण > वण, सर्प > साप,
कर्ण > कान, कर्मन् > काम,
ताम्रक > तांबें, घर्षण > घासणें,
आर्य > आजा.

( ९ ) ल्-ह्-युक्त संयोग—बिल्व > बेल,
गर्हणक > गाऱ्हाणें.

**ज्ञातव्य**—पूर्वघटक स्पर्श किंवा र्, आणि उत्तरघटक स्पर्श,—असा ( नस्य रहित ) संयोग मराठींत येतांना कधी-कधीं त्याचे स्थानीं, उत्तरस्पर्श ( प्रवासांत द्विरुक्त होऊन, पुढे ) एकेरीच शेष राहतो. हा एकेरी स्पर्श ( क ) दीर्घोत्तर राहिल्यास विकल्पाने, व ( ख ) ऱ्हस्वोत्तर राहिल्यास नियमाने, **सनस्य** असतो; जसें —( क ) अक्ष > अच्छ > आँस, प्रस्तर > पत्थर > पाथर, महार्घ > महग्घ > महाग, अर्चिस् > आँच; ( ख ) युद्ध > जुज्झ > जुंझ > झुंज, कूर्च > कुच्च > कुंचा, समर्घ > समग्घ > सवंग ( हिंदी-महार्घ > महंगा ).

१५. **तद्भवांतील नस्योत्पत्ति**—ढक्का → डंका, उच्च → उंच, कुट्टनी → कुंटीण, भित्ति → भिंत, पिप्पल → पिंपळ, युद्ध → झुंज, ( शुल्बपासून ) सुब्ब → सुंभ, ( कूर्चक → ) कुच्चक → कुंचा, [ मूर्धन् → ] ) मुद्ढ → मुंड; ( वृश्चिक → वुश्चिक → वुच्छिक → [ स्वरविपर्ययाने ] ) विच्छुक → विंचू हीं उदाहरणें स्पष्ट सांगतात की, द्वित्वसंयोग स्वयंसिद्ध किंवा ( पूर्वी नसलेले = ) अन्यपूर्व मराठींत उतरतांना, कधी-कधी त्यांच्या प्रथम घटकाचा अनुस्वार होतो. ( वत्स →) वच्छ → वांसरूं, (पक्ष →) पक्ख → पुंख, आस्तरण →...अंथरूण, यांत हाच विकार झाला आहे. येथे शंका-द्ध्, च्छ्, क्ख्,

( २ ) संयोगांतून ऊष्मवर्ण स्वतः गळाला तरी त्याच्या सप्राणत्वाची ( = ह-विशिष्ट उच्चारणाची ) छाया अवशिष्ट व्यंजनांत शिरते.

( क ) ऊन्ह, उन्हांत यांमध्ये उच्चारतः साक्षात् ह् नसून केवळ त्याची छाया आहे. कारण या ह्-मुळे मागील स्वरास गुरुत्व येत नाहीं, न् त्या स्वराबरोबर उच्चारण्यांत येत नाहीं. ( ख ) या छायेमुळे सहचर ( नस्येतर ) स्पर्श यथासंभव विषमाचा सम होतो. ( क्ष > ख, मस्तक > माथें, रक्षण > राखण. )

यांत द्वित्वसंयोग कोठे आहे ? **उत्तर**—वर्गातील ( द्वितीय किंवा चतुर्थ = ) सम वर्णांचे द्वित्वसंयोग असणें शक्य नाही. कारण अशा संयोगांतील पूर्वघटक पुढील व्यंजनाच्या दाबानें ( ह-कारोच्चारणरहित होऊन ) समाचा विषम अवश्य बनणार. रुक्खा शब्दांत क्-चे स्थानीं ख् उच्चारण्याचा प्रयत्न करून पाहा; तो सिद्ध व्हावयाचा नाही. तेव्हा **समव्यंजनांचे द्वित्वसंयोग** या शब्दांनी क्ख् द्ध् त्थ् असलेच संयोग येथे विहित समजावे.

या नियमानुसार पाहतां पक्ष →...पंख किंवा वृश्चिक →...विंचू यांतील नस्याप्रमाणे, इक्षु → उच्छु → ऊंस ( पृ. ३१, १११ ) यांतीलहि नस्य व्युत्पन्न आहे, हें सुज्ञांनी ध्यानीं घ्यावें. हा नस्योत्पत्तीचा नियम ग्रंथकाराचे ध्यानांत आलेला दिसत नाही.

येथे प्रस्तावनेचें परीक्षण संपवितों. सामान्यतः असें म्हणतां येईल की, ऐतिहासिक व इतर लौकिक विचारांपुरती ही प्रस्तावना बरीच मार्गदर्शक, उपयुक्त व वाचनीय झाली आहे. आता आपण कोशाकडे म्ह० ग्रंथाच्या मुख्य प्रतिपाद्य भागाकडे वळूं. यांत आपण प्रथम व्युत्पत्तीच्या प्रयोजनाचा विचार करूं; व नंतर त्यांतील अपेक्षेप्रमाणे हा भाग किती उपयुक्त झाला आहे, हें पाहूं.

---

## साभार स्वीकार

### स्वाध्यायमाला : संच ५ वा

( अनाथ-विद्यार्थी-गृह-प्रकाशन )

पुणें २

ह्या संचांत ( क्रमांक १०१ ते १२५ अशा ) पंचवीस पुस्तकांचा समावेश केला असून त्यांत, भौतिक शास्त्रें, व्यावहारिक विषय, इतिहास, अर्वाचीन चरित्रें, भूगोल, जीवशास्त्र अशा अनेक विषयांवर विद्यार्थ्यांना उपयुक्त अशी माहिती अधिकारी लेखकांकडून मागवून प्रसिद्ध करण्यांत आली आहे. मालेची उपयुक्तता मान्यच झाली असल्यामुळे तीबद्दल निराळें सांगणें नलगे.

### भारतीय आदर्श ( भाग पहिला )

लेखक-प्रकाशक

**बाळकृष्ण मार्तंड दाभाडे, एम्. ए.,**

छत्रीबाजार, लश्कर, ग्वाल्हेर.

**किं. एक रुपया.**

( १ ) गुरुदेव रवींद्रनाथ टागोर, ( २ ) अवनींद्रनाथ टागोर, ( ३ ) कमलादेवी चट्टोपाध्याय, ( ४ ) उदयशंकर, ( ५ ) देवी सरोजिनी नायडू, ( ६ ) जे. कृष्णामूर्ति, अशीं ( तरुण विद्यार्थ्यांच्यासाठी ) सहा चरित्रें.

---

संपादक-**पां. श्री. टिल्लू, ३८ झावबाची** वाडी, मुंबई ४, यांनी प्रकाशिलेलें वाङ्मयः-

( मूल्य सहा पासून आठ आण्यांपर्यंत ) राष्ट्रसंगीत—पुष्प १ व २; पं. मदनमोहन मालवीय; फिल्मी गाना; महानंदा; माई जयप्रकाश; नाना पाटील; जय हिन्द गीतें.

# — परीक्षणें —

## काव्यः —

गीताञ्जलि—अनु० त्र्यं. र. देवगिरीकर, चित्रशाळा, पुणें २; मूल्य ३॥ रुपये.

काही ग्रंथांची गोडी अवीट असते. जों जों अधिकाधिक वाचावेत तों तों त्यांतील रसांचा लाभ जास्त जास्त होत जातो. रवीन्द्रनाथांची 'गीतांजलि' हा एक असाच अक्षरग्रंथ आहे. मराठींत त्याचे इंग्रजीवरून अनुवाद झाले आहेत. पण संपूर्णपणें मूळ बंगालींतून झालेला हा पहिलाच अनुवाद आहे. तो करण्यांत अनुवादकाने प्रयत्नांची कसूर केली नाही. परंतु अशा अभिजात ग्रंथांचा मनासारखा अनुवाद साधणें जडच जातें. शब्दाला शब्द देऊन अर्थ करण्याने त्या साहित्यकाराच्या प्रभावी शैलीची ओळख होत नाही; वरें समानधर्मी मराठी प्रतिशब्द योजावे तर कित्येक वेळां अतिव्याप्ति तर कित्येक वेळां अव्याप्ति होण्याचा संभव असतो. शिवाय अत्यंत संस्कृतप्रचुर शैलींत लिहिलेल्या ग्रंथाचा सुबोध मराठी अनुवाद करावयाचा म्हटलें म्हणजे मुळांतील शब्दसौंदर्याला मुकावें लागतें. आणि रवीन्द्रांच्या बाबतींत तर एक गोष्ट खास लक्षांत ठेवावी लागते की त्यांचा प्रत्येक शब्द अपरिहार्य असतो, त्यांतील अर्थ निश्चित संकेतांनी बनलेला असतो. उपनिषदांतील अर्थच्छटांनी गंभीर बनलेली शब्दयोजना मराठींत आणतांना 'सुबोध' करूं पाहणें म्हणजे मूळच्या मव्यतेला वैगरूळ करून टाकणें होय. प्रस्तुत अनुवादांत मुळांतील अर्थघन शब्दसौष्ठव बरेंचसें कायम ठेवलें आहे. परंतु काही ठिकाणीं मुळांतील शब्दच कायम ठेवणें मूळ ग्रंथाच्या सर्वांगीण महत्त्वाच्या दृष्टीने योग्य झालें असतें. रवीन्द्रांची 'गीतांजलि' हा रवीन्द्रांच्या संपूर्ण व्यक्तित्वाचा आविष्कार आहे आणि ज्या माध्यमांतून तें व्यक्त झालें त्याची यथार्थ जाणीव होण्यास मुळांतील भाषासरणी जास्तींत जास्त कायम ठेवणें हाच एक मार्ग उरतो, उदा० 'अंतरतर', 'अंतर्यामी' ह्या शब्दांना विशिष्ट अर्थ आहे व तो 'जीवींच्या जीवना' वगैरे प्रतिशब्दांनी पूर्ण व्यक्त होत नाही. स्वरमधुर गीतांच्या रूपाने अवतीर्ण झालेल्या कवितांचा मराठींत गद्यकाव्याच्या धर्तीवर अनुवाद करावा लागल्यामुळे वाचक मोठ्याच लाभाला मुकतो. पण असें होणें अनिवार्य आहे. बंगालींतील शब्दरचना फार तर बऱ्याच अंशाने मराठींत कायम ठेवतां येईल. पण रवीन्द्रांनी खास प्रयोग करून घडविलेलीं गीतें व त्यांची स्वरयोजना मराठींत आणणें फारच कठीण आहे. गुजरातींत क्वचित् मुळांतील चाल कायम ठेवून अनुवाद करण्याचे प्रयत्न होतात. कानडींतहि मूळ स्वरसंहति कायम ठेवून 'गीतांजली'तील काही गीतांचा अनुवाद झाल्याचें ऐकिवांत आहे. अशा तऱ्हेचा प्रयत्न पुढेमागे कोणीतरी करून पाहीलहि. संगीतमयता हा आत्मशक्तीच्या आविष्काराचा एक परमलोभनीय विशेष आहे अशी रवीन्द्रनाथांची धारणा होती. सर्व कलांत स्वराधिष्ठित संगीतकला शुद्धतम कला होय. परमात्म्याचा प्रथम साक्षात्कार ध्वनीने झाला म्हणून नाद हें ब्रह्माचेंच एक रूप मानलें गेलें. रवीन्द्रनाथांची तर तशी श्रद्धाच आहे. त्या संगीताचे जे प्रयोग या कविसम्राटाने केले ते मराठीला अज्ञातच राहावे हें योग्य नाही. 'शांतिनिकेतना'तील

वातावरणांत संस्कार पावलेली जी रसिक मंडळी महाराष्ट्रांत आहेत त्यांनी अशा तऱ्हेचे प्रयत्न करावेत अशी अपेक्षा व आशा करणें अप्रस्तुत होणार नाही.

प्रस्तुत मराठी 'गीतांजली'त व्यक्त झालेलें अनुवादकाचें मनहि अत्यंत भावकोमल व श्रद्धावान् दिसतें. 'गीतांजली'वर त्याचें प्रेम आहे, रवीन्द्रांवर त्याची भक्ति आहे. मोठ्या जिव्हाळ्याने त्याने रवीन्द्रांच्या अमर वंगवाणीला 'अमृतातेंहि पैजा' जिंकणाऱ्या मराठीचा साज चढविला आहे. बहुतेक टिकाणीं तो टीकठाक बसला आहे. किंचित् गुणगुणण्याच्या स्वरांत आपण एकेक गीत वाचूं लागलों तर त्यांत आकर्षिले जातों. पुन्हा पुन्हा तीं गुणगुणावींशीं वाटतात. हें मोठेपण रवीन्द्रांच्या प्रतिभेचें तर खरेंच पण तें आकर्षण मराठींतहि कायम ठेवणें हें कांही कमी महत्त्वाचें काम नव्हे. आणि असें करतांना मुळाला धरून अनुवाद करणें फारच कठीण असतें. श्री. देवगिरीकरांनी हें सर्व उत्तम तऱ्हेने साध्य करून घेतलें. अगदी क्वचित् टिकाणीं त्रुटि दिसतील- तशा बंगालीच्या एका तज्ज्ञ रसिकानी दाखविल्याहि आहेत. पण त्यांची संख्या अत्यल्प असून पुढील आवृत्तींत ते दोष काढूनहि टाकतां येतील. त्यांपैकी अगदी उघड अशी चूक म्हणजे बंगाली शीर्षकचरणाचें देवनागरी रूपांतर देतांना झालेले प्रमाद. आपणांस प्रस्तावनेंतील तीच शीर्षकें व पुस्तकांतील शीर्षकें यांची तुलना केल्यास ते आढळून येतील.

या अनुवाद-ग्रंथाचा एक स्वागतार्ह विशेष म्हणजे आचार्य भागवतांची प्रस्तावना. रवीन्द्रांच्या 'गीतांजली'चें त्यांच्या जीवनांत अनेक दृष्टींनी अपूर्व स्थान आहे आणि भारताच्या जीवनांतहि तिचें स्थान अपूर्वच आहे. 'गीतांजली'त व्यक्त होणाऱ्या रवीन्द्रप्रतिभेच्या निरनिराळ्या बाजू त्यांनी स्पष्ट करून दाखविल्या आहेत. रवीन्द्रांचा जीवनविषयक दृष्टिकोन समजून घेऊन त्यांचें काव्य वाचल्यास आपणांस अधिक गोडीचा लाभ होतो. आचार्य भागवतांच्या प्रस्तावनेने तें सुकर केलें आहे. त्यांतील एक भाग महाराष्ट्रीय रसिकांनी खास ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. प्रस्तावनाकर्त्यांना रवीन्द्रनाथांविषयी महाराष्ट्रांत अनेक गैरसमज पसरलेले दिसले. तसे ते आपणांसहि आढळतात. 'गीतांजली'चें नांव काढलें की जणू कांही अंगांत आल्याप्रमाणे चिडून रवीन्द्रांपेक्षां तुकारामांतील भक्तीचा उमाळा जास्त असें अट्टाहासाने शाबीत करावयाचें, रवीन्द्रांच्या राहणीला 'राजयोगी' असें कुत्सागर्भ नांव देऊन इतर कुणाची तरी उगीचच बाजू घ्यायची, त्यांच्या राष्ट्रप्रेमाविषयी शंका घेऊन टागोर-गांधीवादाचा अर्धवट समजुतीने उल्लेख करावयाचा, त्यांच्या सर्वतोगामी प्रज्ञेचा चमत्कार म्हणून कोणीं त्यांच्या विविध जीवनक्षेत्रांतील कामगिरीचा उल्लेख केला की उपहासाचा प्रयत्न करावयाचा. कांहींना त्याबद्दल सात्त्विक नापसंती असते, तर बहुतेकांना उगाचच विरोध करण्याची मजा लुटायची असते. आपण किती गैरसमज करून घेतों याचें प्रत्यंतर या ग्रंथाच्या प्रकाशनप्रसंगीं बंगाली जाणणाऱ्या अनेक वक्त्यांनी स्पष्टपणें दिलेल्या कबुलीजबाबाने आपणांस मिळतें. याचें अगदी ताजें उदाहरण म्हणजे रवीन्द्रांनी मधुसूदन दत्तांच्या 'मेघनादवधा'बद्दल तरुणपणीं काढलेले उद्गार, व रवीन्द्रांना उत्तरवयांतहि लोकप्रियतेचा हव्यास होता इत्यादि प्रो. डे यांच्या वार्तालापांतील मतें, यांना मिळालेली प्रसिद्धि. परंतु नंतर रवीन्द्रनाथांनीच तारुण्याच्या उन्मादांत आपण एका थोर कवीला दोष दिला म्हणून जें 'रेमिनिसेन्स'मध्ये लिहिलें आहे, किंवा 'साहित्य' ग्रंथांतील 'साहित्यसृष्टि' निबंधांत जो मेघनादवधाचा सादर उल्लेख केला आहे त्याचा मात्र कोणीहि उल्लेख करीत नाही. प्रो. डे यांच्या मताचाहि कोणी अन्य अधिकारी व्यक्ति उकाला करीलच. पण मूर्तिभंजनाच्या या खटाटोपांत अपुरी माहिती आणि केवळ भंजनाची आवड आढळते. तेव्हा तें

बरें वाटत नाही. आचार्य भागवतांनी आपल्या प्रस्तावनेंत टागोरांच्या अनेक विशेषांचें दिग्दर्शन केलें आहे. त्यांच्या 'चौफुला' या प्रस्तावनासंग्रहांतील लेखाच्या तोडीचाच हाहि लेख आहे. वाचकांनी तो अवश्य अभ्यासावा असा आहे.

असा हा मार्मिक प्रस्तावनेने मंडित झालेला आणि रवीन्द्रांच्या सुंदर रंगित चित्राच्या आवरणाने सजविलेला हा ग्रंथ अनुवाद म्हणून कसा उत्तम आहे याचें दिग्दर्शन पुढील उताऱ्याने सहज होण्यासारखें आहे.

जेव्हा जीवन शुष्क होऊन जातें,
तेव्हा तुझ्या करुणेचा वर्षाव करीत तूं ये.
ज्या वेळीं जीवनांतील सारी गोडी लुप्त होते,
त्या वेळीं गीतरूपी अमृताच्या रसाने तूं ये.

... ... ...

ज्या वेळीं वासना प्रचंड धूळ उसळवून
अंध करून अज्ञानाने भुलवितात,
त्या वेळीं हे पवित्रा, हे अनिद्रा,
तेजस्वी प्रकाशाने तूं ये. (५८ वें गीत)

ना. ग. जोशी.

**कर्णहंस**— संपा० व प्रका० नरहर सदाशिव जोशी, खरशीकरशास्त्री, मु. पो. खरशी, जि. सातारा; किं. १ रुपया.

इ. स. १६ व्या शतकांत, शिवछत्रपतींचे आजोबा मालोजी यांचे वेळीं शांतलिंग म्हणून एक लिंगायत संत शिंगणापुरास होऊन गेले. शान्तलिंग हे शिंगणापूरच्या लिंगायत मठाचे अधिपति असून त्यांच्या शिष्यांत लिंगायतांबरोबर ब्राह्मणहि होते. कृष्णाप्पा नांवाचे एक ब्राह्मण संत शांतलिंगांचे शिष्य. हेच कृष्णाप्पा दासपंचायतनांतील जयरामस्वामी वडगांवकरांचे गुरु. प्रकृत 'कर्णहंस' म्हणजे सदतीस अध्यात्मपर संस्कृत श्लोकांवर शांतलिंगांनी मराठींत लिहिलेली ३७७ ओव्यांची टीका आहे. मूळचे सदतीस संस्कृत श्लोक लिंगायतपंथाचे प्रवर्तक चन्नबसवेश्वर यांचे भाचे— एक आचार्य— यांनी रचले आहेत. या श्लोकांत पंचतत्त्वें, सप्तधातु, पंचकोश, कारणशरीर, आत्मा वगैरे नेहमीचेच वेदान्तविषय विवरलेले आहेत. पण वैदिक अध्यात्म व चन्नबसवेश्वरांचें अध्यात्म यांचा समन्वय शान्तलिंगांनी मोठ्या चतुराईने आपल्या मराठी विवरणांत केला आहे हेंच या मराठी अध्यात्मपर टीकेचें खरें वैशिष्ट्य होय.

त्याहूनहि या ग्रंथापेक्षा या ग्रंथावरून जी ऐक्यभावना प्रकट झालेली आहे ती विशेष महत्त्वाची वाटते. खरा धर्म व खरे साधू नेहमीच मतभेदातीत व समदर्शी असतात. वैदिक-लिंगायत एकीचा हा जुना उदात्त संदेश या कालांत सर्वांनी नजरेसमोर ठेवण्यासारखा आहे. देशभक्त नारायणराव बामणगांवकर यांनी सदर प्रकरणाला जोडलेली प्रस्तावना मोठी उद्बोधक असून ती उच्च पातळीवरून लिहिलेली आहे. पण या बाबतींतील खटपटीचें खरें श्रेय सदर ग्रंथाचे संपादक सन्तग्रंथाचे व्यासंगी व वेदान्तशास्त्रपरायण श्री. नरहरशास्त्री खरशीकर यांसच दिलें पाहिजे. त्यांनी मोठ्या व्यापक भूमिकेवरून श्रीशान्तलिंगमहाराजांचें चरित्र लिहून सदर ग्रंथाला अर्थ-विवरणात्मक टीपांचीहि जोड दिली आहे. 'विष्णुदासांची कविता'; 'श्रीकेशव-

स्वामीची कविता', 'सन्त बाहिरजीचें चरित्र' इत्यादि ग्रंथसंपादनाच्या संशोधनात्मक भरीव कामगिरींत सदर कर्णहंसामुळे शास्त्रीबुवांनी फार मोलाची भर घातली आहे, यांत शंका नाही. असो. महाराष्ट्रांतील पहिल्या लिंगायत संताचा हा अनुपलब्ध मराठी ग्रंथ उपलब्ध करून देण्यांत संपादकाव्यतिरिक्त ज्या इतर सज्जनांचे श्रम कारणीभूत झाले त्यांचेहि अभिनंदन करणें शेवटीं आवश्यक आहे. के. ना. वाटवे.

दुहिता—( कवितासंग्रह )— कवि वि. ज. सहस्त्रबुद्धे; प्रका० ना. तं. कातगडे, स्नेहसंवर्धक संघ, मिरज; मूल्य दोन रुपये.

कवि गिरीश, श्री. यशवन्त व प्रा. रा. श्री. जोग ह्यांच्या प्रांजळ अभिप्रायांसह हा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला आहे. कवीची मनोवृत्ति सात्त्विक आहे, भाषा सुबोध आहे, विचारांची अभिव्यक्ति निर्मळ आहे. विशेषतः जितके म्हणून अभंग कवीच्या लेखणींतून उतरले तितके सारे प्रासादिक आणि भक्तिभावपूर्ण आहेत. त्रस्त मनाला शांति देण्यासारखी ही दुहिता तत्त्वशाली आहे. य. दि. पें.

शिवशाहीचा अरुणोदय अर्थात् अफजलवध—ले० पु. वा. गोवईकर (शामानुज); प्रका० य. रा. दाते, ७५९/८७ शिवाजीनगर, पुणें; किं. १ रु.

सुविख्यात अज्ञानदासाच्या पोवाड्यानंतर अफजलखान वधाचा दुसरा पोवाडा क्वचितच लोकप्रिय झाला असें म्हटल्यास चुकणार नाही. तेव्हा प्रस्तुतचा श्री. गोवईकर किंवा कवि शामानुज यांचा हा शाळीवजा वृत्तांतला पोवाडा मुलांच्या तोंडीं कितपत बसेल याची शंका वाटते. काव्यरचनेला प्रेरणा मिळाल्याचें श्रेय मुलाकडे जात असलें तरी एक हजारांवर ओळी, एकाच मंद चालीच्या, मुलांना यशवंतादि कवींच्या भावगीतांपासून काढून, वाचावयास लावण्याइतपत सौंदर्य या जुन्या धर्तीच्या काव्यांत नाही खास. असो. पुरस्कारांत म. म. प्रा. पोतदार यांनी जें म्हटलें आहे तेंच यथार्थ आहे. चिं. ग. कर्वे.

## नाट्यः—

न्यायाचा शोध—( गद्य संगीत नाटक )— ले० र. धों. कर्वे, एम्.ए.; किंमत १ रुपया; पृष्ठें ७०.

अमेरिकेंत अपघातात सांपडून पंगू बनलेली शालिनी व मेडिकल कॉलेजांत शिकत असलेली मीनाक्षी ह्या सधन दादासाहेबांच्या अनुक्रमें औरस व अनौरस मुली असतात. शालिनी गर्भवती झाल्यास तिला मृत्यु येईल असा डॉक्टरी सल्ला मिळतो, त्यामुळे तिचा पति उल्हास हा सुमन या तरुणीशी मैत्री करतो. अतिश्रमामुळे व मानसिक व्यथेमुळे शालिनी खंगते व मरते. धारवाड हा एक आचरट जहागीरदार मीनाक्षीच्या मागे लग्नाचा लकडा लावतो. परंतु उल्हासाचा हुषार मित्र डॉक्टर वसंत व मीनाक्षी यांचा प्रेमविवाह होतो.

बुद्धि व पैसा यांत श्रेष्ठ कोण, प्रेमाचा व लग्नाचा परस्परसंबंध काय, पत्नी आजारी असून, ती गर्भवती होणें तिला घातुक असल्यास, शस्त्रक्रिया नवऱ्याने करवून घ्यावी कीं बायकोने, स्त्रीने ( पुरुषाप्रमाणे ) अनेक पति करावेत काय, पुरुषाने संततीकरिता प्रथम पत्नी असतांना दुसरें लग्न करावें काय, पुरुष व स्त्री यांची स्वातंत्र्याची मर्यादा कोणती, बायको आजारी असतांना नवऱ्याने व्रतस्थ राहावें कीं मिळेल तें संभोगसुख परदारागमन व अन्य मार्गानें घ्यावें, वगैरे वैवाहिक जीवनांतील गोष्टींतील न्यायाचा शोध व्हावा म्हणून या नाटकांत ह्याविषयीं बरीच चर्चा केली आहे. इंग्लंड-अमेरिकेला जाणें, अपघात होणें, रखेली असणें, या गोष्टी सरसहा होणाऱ्या अशा दाखविल्या आहेत. त्यामुळे एकंदर वातावरण परदेशीय व परकीय वाटतें. पृष्ठ ४९ वर जातां जातां कृष्णचरित्राला विनाकारण कोपरखळी मारली आहे.

कोर्थिंबिरीच्या काड्या— ले० मनोहर माधव अळतेकर; पृष्ठें १९२; मूल्य ३॥ रु.

( १ ) फुलराणी, ( २ ) लफंडाव, ( ३ ) विनयभंग, ( ४ ) आपण आहोंत सामान्य माणसं, ( ५ ) आजची शारदा, ( ६ ) अदलाबदल, ( ७ ) पण एक होती आजी, ( ८ ) ढेकणांच्या संगें—– अशा ( शेवटच्या दोन सोडून ) वेळोवेळीं नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या एकांकिका ' कोथिंबिरीच्या काड्या ' या संग्रहांत प्रसिद्ध झाल्या आहेत. सुशिक्षित कुमारिकांच्या लग्नाचा अवघड प्रश्न, मुलांमुलींनी आपल्या मर्जीप्रमाणे लग्नें ठरविणें इष्ट, विनयभंगामुळे दृढ झालेला प्रेमविवाह, दारिद्र्यामुळे करावें लागणारें अपत्य-नियंत्रण, जरठकुमारीविवाहाने पैसा–प्रेम–समाजसुधारणेचें श्रेय असा तिहेरी फायदा करून घेऊं पाहणारी आजची शारदा, अदलाबदलीनें झालेलें लग्न, पैशासाठी प्रेम करणारी सुशिक्षित बेरकी मुलगी व मायाळू गरीब आजी, शिक्षकांची शोचनीय परिस्थिति इत्यादि गोष्टी या एकांकिकांत आल्या आहेत.

पहिल्या सात एकांकिकांचा विषय विवाह किंवा वैवाहिक जीवनासंबंधीच असून त्यांचें स्वरूप प्रहसनात्मक आहे. सचित्र आवरणपृष्ठाच्या (wrapper) आंतल्या बाजूस (शेवटीं) व प्रस्तावनेंत 'एकांकिका' या नाट्यप्रकारासंबंधी जी माहिती दिली आहे ती वाचनीय आहे. परंतु ह्या सर्व एकांकिका स्वतंत्र असून कथानक साधें व ठसकेबाज, पात्रांचें स्वभावरेखन योग्य, संवाद मार्मिक वगैरे जें गुणगायन आवरणपृष्ठाच्या आंतील बाजूस ( प्रारंभीं ) केलें आहे तें जाहिरातवजा वाटतें. संयम, सहजता व नाट्य हे निकष लेखकानेच प्रस्तावनेंत सुचविले आहेत. एकांकिकांचा विषय विवाह हा एकच असल्यामुळे त्यांत विविधता व कल्पनाशक्तीची विशालता कमी असून त्यांचें स्वरूप प्रहसनात्मक आहे ह्या लेखकानेच प्रस्तावनेंत दिलेल्या प्रांजळ 'आत्मपरीक्षणा'शीं सहमत होणें जड जाईल असें वाटत नाहीं. विनोदाकरिता कांहीं गोष्टींना उगीचच चावा घेतला असून कल्पनांचें भांडवल तोकडें आहे असें वाटतें. तरीसुद्धा भाषा ओघवती असून संवादांत नाट्य आढळून येतें. म्हणून लेखकाच्या अपेक्षेप्रमाणे या 'कोथिंबिरीच्या काड्या' थोडीशी रुचि आणण्याचें कार्य करतील हें खरें परंतु 'मराठी भाषेच्या मंडई'त प्रवेश मिळाल्यावर लेखक 'कोथिंबिरीच्या काड्या' विकण्यावरच संतुष्ट न राहता आर्थिक मौल्यवान् व अन्नसत्वांनी परिपूर्ण ( भ्रमाचे भोपळे सोडून ) अशा भाजीपाल्याचा व फळांचा व्यवहार करील अशी आशा वाटते. मग करतांसवरतां बारा सोळा काय होईल तें खरें !

दीपिका– ले० व प्रका० बाळकृष्ण मार्तंड दाभाडे, ग्वाल्हेर; पृष्ठें ३५; मूल्य आठ आणे.

ही एक तीन अंकी छोटेखानी नाटिका आहे. प्रथितयश व लोकप्रिय लेखिका मीनाक्षी, काँग्रेसच्या तिरंगी निशाणाखाली देशकार्य करणारी समाजवादी तरुणी चित्रा व कलावान् चित्रकार शशिकान्त हीं मित्र आहेत. कार्ल मार्क्सच्या 'कापिटल'च्या मराठी रूपांतरांत शशिकांताने जीं व्यंगचित्रें काढलीं त्यांबद्दल त्याला नोकरीवरून कमी करण्यांत येतें; तर मिरवणुकींत तिरंगी झेंड्याचें रक्षण करीत असतां झालेल्या जबर जखमेमुळे चित्रेचा अंत होतो. यामुळे मीनाक्षीचें मतपरिवर्तन होऊन ती झेंडामिरवणूक व सत्याग्रह यांत भाग घेण्याचें ठरविते. कला ही जीवनाकरिता आहे, कलेने क्रांति घडवून आणली पाहिजे, रक्ताशिवाय क्रांति यशस्वी होणार नाही म्हणून लेखक व कलावान् यांच्या कार्यांचा उद्देश ही क्रांति घडविणें हा असला पाहिजे असें प्रमेय श्री. दाभाडे यांना मांडावयाचें आहे. कुसुमाग्रज यांची 'बळी' ही कविता व हिंदींतील 'दीपक' ही एकांकिका यांचा उपयोग करून घेतला आहे. "जीवनमार्गांत प्रकाशाचा किरण फेकण्यास ही 'दीपिका' प्रकाशित झाली आहे" असें लेखकाने निवेदिलें आहे. शालेय संमेलनप्रसंगीं प्रयोगरूपाने कांही वेळ करमणुकीचा किरण ही 'दीपिका' देईल असें वाटतें.

न. का. घारपुरे.

## कादंबरीः—

कमळाचं जाळं—ले० कु. सरोजिनी बाबर, बी.ए. (ऑनर्स); प्रका०—सौ. उषा जोशी, ५३३ सदाशिव, पुणें शहर; मूल्य साडेतीन रुपये.

प्रत्येकाला नवीनच विषय नेहमी सुचेल असें नाही. त्यांत नवीन लेखकाला तर विषय निवडणें फार कठीण जातें. पण मग आपल्या अनुभवाच्या परिसरांतील विषय निवडावा, हें ओघानेच येतें. एखाद्या प्रचलित विषयाला हात घालावयाचा आणि त्याचें कलात्मक चित्र रंगविण्याचा प्रयत्न करावयाचा, पण विषय, कथानकमांडणी, स्वभावलेखन, यांची मनाशीं जुळणी नीट झाली नाही तर काय होतें, यांचें उत्तम उदाहरण म्हणजे प्रस्तुतची 'छोटी' (इति प्रो. पोतदार) कादंबरी आहे. 'कारण ललित शाखेंत माझा तसा वावर नाही' हें लिहिणाऱ्या प्रो. पोतदारांना देखील या कादंबरींत 'खरा झगडा' आढळत नाही. कु. बाबर यांच्यासारख्या नवोदित लेखिकेने तंत्राचा अभ्यास करावयास हवा. या अभ्यासाला अवलोकनाची जोड हवी. 'नुसतें लांबून पाहिलें तर कांहीच दिसत नाही. चुकून दिसलेंच तर तें कमळाच्या जाळ्याप्रमाणे दिशाभूल करतें.' उपेचें दाखविलेलें परिवर्तन तर 'मंजुघोषे'च्या काळालाच शोभणारें आहे. केवळ भाषेच्या बळावर कलाकृति रंजक करण्याचा यत्न नवोदिताला जमणें शक्य नाही. नवनिर्मितीची वाण मानणाऱ्या प्रथितयश लेखकांना तो करूं द्यावा. कु. बाबर यांनी उत्कट मनरप्रसंगानी युक्त असें कथानक कल्पून त्याची सजावट आपल्या मूळच्या सुदर भाषेने करावी. त्यांच्या नव्या कादंबरीची आम्ही प्रतीक्षा करीत आहोत.

चंद्रकुमार डांगे.

झुलता मनोरा—ले० भा. वि. वरेरकर; धरित्री प्रकाशन; मूल्य तीन रुपये.

व्यक्तींचे स्वभाव परिस्थितींतून निर्माण होतात. पण कांही व्यक्ती आपला स्वभाव असाच आहे असा ग्रह करून घेऊन एका विशिष्ट परिस्थितींतच राहण्याचा प्रयत्न करतात. वरेरकरांच्या 'झुलत्या मनोऱ्यां'तील कृष्णराव हे असेच गृहस्थ आहेत. आपली सनातनी वृत्ति संभाळण्याकरिता ते जगापासून फटकून राहतात. पण अनपेक्षितपणें त्यांच्याहून अगदी भिन्न स्वभाव असणाऱ्या केदार जाधवाशीं त्यांचा संबंध येतो व नंतर मनोहरा, सुलोचना, सदाशिव या व्यक्तीहि त्याच्या आयुष्यांत प्रवेश करतात. कृष्णराव पुराणमताभिमानी तर केदारमध्ये नवविचार, नवीन कल्पना ग्रहण करण्याची असामान्य शक्ति; भंडारी जातीच्या तरुणाशीं लग्न करणारी मनोहरा आणि अवखळ, लाघवी सुलोचना. या सर्वांचे जीवनप्रवाह एकत्र येत असतांनाहि कृष्णरावांचा स्वतःचीं आग्रही मतें टिकविण्याचा अट्टाहास चाललेला असतो. पूर्वसंस्कार व अनुभूत भावना यांचें कृष्णरावांच्या मनांतील द्वंद्व वरेकररांनी अत्यंत संयमानें आणि कौशल्याने चित्रित केलेलें आहे. केदार जाधव व मनोहरा यांच्या व्यक्तिरेखा अधिक उठावदार असल्या तरी कृष्णरावाच्या भावड्या स्वभावाचें चित्रणच अधिक सुंदर झालें आहे. कादंबरींत राजकारण हें चटकदारपणा आणण्याकरिता घुसडलेलें नाही. केदार जाधवाच्या जीवनाचा गाभाच राजकारण आहे व अखेर कृष्णराव स्वतःचीं मतें बदलून राजकीय प्रवाहांत ओढला जातो.

या कादंबरीचें वैशिष्टय म्हणजे कथानक व वातावरण यांमधील वास्तवता. यांत ओढूनताणून आणलेले नाट्यमय, भावनोत्कट प्रसंग नाहीत. मापेचा फुलोरा नाही अगर हळुवार स्वप्नसृष्टींत वावरणाऱ्या व्यक्ती नाहीत. कादंबरींत अनेक नवीन विचार सुचविलेले आहेत. पण असे विचार व्यक्त करणें हें केदारच्या स्वभावाला धरून असल्यामुळे ते कलावस्तूला कमीपणा आणीत नाहीत.

एका सरळ, कांहीशा भावड्या व्यक्तीच्या मनाचें हें चित्र रेखाटतांना लेखकाला समाजाचें व त्या व्यक्तीच्या मनाचेंहि विश्लेषण करितां आलें असतें. त्या दृष्टीने मात्र ही कादंबरी अत्यंत अपुरी आहे. यांत वरेरकरानी समाजांतील ढोंग, चालीरीती, यांवर टीका केली आहे. पण ही टीका उथळ वाटते. कारण या व्यंगापाठीमागील समाजाच्या अंतर्मनाचें दर्शन वाचकाला होत नाही. वरेरकरांसारख्या प्रथितयश लेखकाकडून ही अपेक्षा करणें चुकीचें ठरणार नाही.

नवी वसाहत— ले० प्रो. भा. म. गोरे; प्रका० दा. ना. मोघे, कोल्हापूर.

लघुकथेंत व्यक्ती अगर भावनोत्कट घटना यांचें चित्रण करणें शक्य असतें. लघुकथेच्या आटोपशीर विस्तारांत वातावरण निर्माण करणें तितकेंसे सुलभ नसतें. पण या बाबतींत प्रा. गोरे यांनी चांगलेंच यश संपादन केलें आहे. 'नर्मदे ऽ हर' ही प्रादेशिक भावकथा या संग्रहांतील सर्वोत्कृष्ट म्हणून दाखवितां येईल. नर्मदेशीं महादेवरावांच्या जीवनाचें झालेलें तादात्म्य दाखवून लेखकाने नर्मदाकांठच्या भूप्रदेशाचें व जीवनाचें हुबेहूब चित्र रेखाटलें आहे. 'मंगलभुवन' व 'पलायन' या दोन लघुकथात हिंदी व गुजराथी यांचा मार्मिकतेने उपयोग केलेला आहे.

'सर्पाची जात' व 'दुधाची घार' या लघुकथा श्री. वि. सी. गुर्जर यांच्या पद्धतीच्या आहेत. प्रा. गोरे हेहि श्री. गुर्जरांप्रमाणे साध्या प्रसंगांतून चटकदार गोष्ट निर्माण करूं शकतात. मात्र 'सर्पाची जात' मध्ये सहा सात ओळी उगाचच जाड अक्षरांत छापल्या आहेत. हें त्या गोष्टीचें तात्पर्य आहे असें सुचविण्याचा लेखकाचा हेतु असावा. त्यामुळे मुळांतच कमी असलेल्या कलेची आणखी हानि झाली आहे.

'ठेच', 'समाज सेविका', 'रोमिओ ज्युलिएट' या गोष्टी अगदी सामान्य आहेत.

अंतरिक्षांतून—लेखिका-सिंधू गाडगीळ; मातृभूमि प्रकाशन, अकोला; मूल्य अडीच रुपये.

ठराविक तऱ्हेच्या लघुकथांना कंटाळलेल्या वाचकांना हा वैमानिक जीवनावरील कथासंग्रह खासच आल्हाददायक वाटेल. या संग्रहांतील सर्व कथांची पार्श्वभूमि एकच आहे, तरी देखील त्यामुळे 'तोचतोपणा' ( monotony ) यत्किंचितहि वाटत नाही. वैमानिकाच्या साहसी जीवनाचें दर्शन घडवितांना लेखिकेने अद्भुतरम्यता निर्माण करण्याचा प्रयत्न केला नाही ही अभिनंदनीय गोष्ट आहे. वैमानिक धाडसी असला तरी तो माणूसच असतो. अनेकदा त्याच्या मनाला भीति चाटून जाते; कित्येकदा कर्तव्याचा विसर पडून त्याच्या मनांत भावनांचा कल्लोळ उठतो. हें सर्व वास्तवतेने दाखविल्यामुळे या लघुकथांना उठाव आला आहे. वैमानिकाचें आयुष्य हें मृत्युसमीप असल्यामुळे त्याच्यावर प्रेम करणाऱ्या व्यक्तींची— पत्नीची, आईची, प्रेयसीची काय व्याकुल अवस्था होत असेल हेंहि लेखिकेने बहारीने दाखविलें आहे.

वैमानिकाच्या या साहसी जीवनालाहि प्रणयाची नाजुक किनार असते. पण कधी परिस्थिति तर कधी अपघात यामुळे या प्रणयभावनेचा विलक्षण कोंडमारा होतो. लेखिकेने वैमानिकाच्या जीवनाचें हें अंग अत्यंत संयमाने रेखाटलें आहे.

'स्टुवरडेस', 'गंगासागरांतील प्रेमकथा' व 'समस्यापूर्ति' या तीन कथा अत्यंत हृदयस्पर्शी आहेत.

सिंधू गाडगीळ या वातावरण निर्मिति चांगल्या तऱ्हेने करूं शकतात. त्यांची प्रसंगांची निवडहि चित्तवेधक असते. पण यांतील व्यक्तिरेखा मात्र अधिक स्पष्ट असावयास पाहिजेत. केवळ शरीरयष्टि अगर सौंदर्य यांच्या वर्णनांतून जिवंत व्यक्तिरेखा निर्माण होऊं शकत नाही हें लेखिकेने दृष्टिआड करून चालणार नाही.

मी तुझीच आहे—ले० श्री. वासुदेव पोवळे; धरित्री प्रकाशन; मूल्य अडीच रुपये.

एक ठराविक ठशाची प्रेमकथा. शेखर नांवाचा संसारसुखाकरिता आसुसलेला तरुण नायक, सुलभा नांवाची गृहकृत्यांत दक्ष असणारी नायिका व या दोघांच्या प्रेमांत अडथळा आणूं पाहणारे खलनायक सुलभेचे काका— या तीन व्यक्तींभोवतीं गुंफलेलें हें कथानक आहे. अखेर नायक खलनायकावर मात करतो आणि शेखर व सुलभा दिल्लीला पळून जातात. लेखकाने अवलंबिलेली निवेदनपद्धति भुसभुशीत कथावस्तूमुळे फुकट गेली आहे. कादंबरी लहान आहे हा एकच गुण म्हणून दाखवितां येईल.

ग. प्र. प्रधान.

## निबंध—

हिरवळ ( लघुनिबंधसंग्रह )— ले० व संपा० श्री. वि. स. खांडेकर; प्रका० दा. ना. मोघे, स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य १। रुपाया.

सुप्रसिद्ध लघुनिबंधलेखक श्री. वि. स. खांडेकर यांनी आपल्या पूर्वप्रकाशित 'वायुलहरी', 'चांदण्यांत', 'सायंकाल' आदि सात लघुनिबंधसंग्रहांतून स्वतः निवडलेल्या चौदा लघुनिबंधांचा हा संग्रह आहे. प्रत्येक निबंधाचे प्रारंभीं 'परिचय' व अखेरीस 'अभ्यास' यांची पुस्ती जोडून सदर संग्रहास 'शालेय' वाङ्मयाचें स्वरूप देण्यांत आलें आहे. तसेंच चौदा पृष्ठांच्या प्रास्ताविकांत लघुनिबंध ह्या वाङ्मयप्रकाराचें विवेचनहि लेखकाने थोडक्यांत मार्मिकपणें केलें आहे.

लघुनिबंध या वाङ्मयप्रकाराविषयीचें भावनाप्रवण तरुण विद्यार्थ्यांचें वाढतें औत्सुक्य लक्षांत घेतां प्रस्तुतचा प्रयत्न निःसंशय अभिनंदनीय आहे, नि. श्री. खांडेकरांसारख्या शिक्षण-व्यवसायांत दीड तपाचा कालावधि खर्चिलेल्या सव्यसाची, सहृदय नि जीवनवादी कलावन्त साहित्यिकाचा हा उपक्रम असल्याने त्यास शैक्षणिक दृष्ट्या विशेष औचित्य आहे. लघुनिबंध हा बहुंशीं आत्मनिष्ठ वाङ्मयप्रकार असल्याने वाचक व्यक्तिदर्शनाच्या दृष्टिकोनांतून त्यांच्या 'पुढे पुढे', 'एक अपघात', 'गप्पा' या लघुनिबंधांचा रसास्वाद घेऊं लागला कीं रसिक-कलावन्त, समाज-शिक्षक, जीवनाचे भाष्यकार, भावनाप्रवण कुटुंबवत्सल गृहस्थ असे लेखकाच्या जीवनाचे कांही ठळक पैलू अलंकारिक भाषेच्या मोहक आवरणांतूनहि आपल्या झळाळीने वाचकांस मोहून टाकल्यावांचून रहात नाहीत. लघुनिबंधकार म्हणजे, खांडेकरांच्याच शब्दांत 'असामान्य व्यक्तिमत्त्व असलेला सामान्य मनुष्य' नि लघुनिबंध म्हणजे लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा मधुर व मनमोकळा आविष्कार'—या कसोटीने पाहिलें असतां 'सुखाचा शोध', 'एक भास', 'संकेत' अशांसारख्या निबंधातून जीवनविषयक तत्त्वशोधनाच्या धडपडींत गोंधळून जाऊन लेखकाने आपलें बहुरंगी व्यक्तिमत्त्व मात्र वाचकापासून जाणूनबुजून दूर ठेवलें नाही ना अशी शंका वारंवार आल्यावांचून रहात नाही. (विद्यार्थ्यांच्या दृष्टीने निवड करण्याच्या धोरणामुळे अशा प्रकारांना संक्षेप बसला असण्याचाहि संभव असेल.)

द. के. बर्वे.

मराठी निबंध—प्रा. म. वि. फाटक यांचा हा ग्रंथ मराठीच्या अभ्यासकांस अत्यंत उपयुक्त असा आहे. निबंध या वाङ्मयप्रकाराचें समालोचन आणि विवेचन इतक्या विस्तृतपणें करणारा हा पहिलाच ग्रंथ आहे.

मराठी निबंधाचा विचार करतांना जरूर तेवढा इंग्रजी निबंधाचा इतिहास सांगून मराठी निबंध हा इंग्रजींतूनच आला आहे असें मत प्रा. फाटक यांनी मांडलें आहे.

हें आपलें मत स्पष्ट करण्यासाठी त्यांनी मराठी वाङ्मयांतील आंग्लकालपूर्व वाङ्मयांतील, संतवाङ्मयांतील आणि बखर वगैरे ग्रंथांतील उदाहरणें दिलीं आहेत. त्या वाङ्मयांत निबंधासारखे दिसणारे भाग असले तरी ते निबंध नाहीत कारण ते स्वयंपूर्ण नाहीत.

मराठी निबंधाचा इतिहास अतिशय विस्तारपूर्वक दिला आहे कादंबरी, कथा, नाटक, काव्य आणि शास्त्रीय वाङ्मय या प्रकारांशिवाय राहिलेल्या सर्व वाङ्मयाचाच हा इतिहास आहे. त्यांत ग्रंथकार व वृत्तपत्रकार आहेत. हा इतिहास देतांना कालखंडाप्रमाणे, नियतकालिकाप्रमाणे, वाङ्मयप्रकाराप्रमाणे तसेंच प्रसिद्ध लेखकांप्रमाणे विभाग पाडले आहेत. एकाच प्रकरणांत ऐतिहासिक समालोचनाच्या विविध पद्धति स्वीकारल्यामुळे हें प्रकरण विस्कळित झालें आहे. त्यापेक्षा कोणत्यातरी एका पद्धतीने निबंध वाङ्मयाचे विभाग पाडून त्या पद्धतीप्रमाणे समालोचन करणें उद्बोधक ठरलें असतें. परंतु असा विस्कळितपणा बऱ्याच ठिकाणीं असला तरी ग्रंथांतील माहिती अतिशय उपयुक्त आहे. अभ्यासकास तिची पुनर्रचना करून घेण्याखेरीजकडे जास्त कष्ट करण्याची वेळ येणार नाही.

ऐतिहासिक समालोचनानंतर लघुनिबंधाचें विवेचन केलें आहे. या विवेचनांत लघुनिबंधाचें वैशिष्ट्य लालित्यपूर्ण भाषेंतच मांडलें आहे. लघुनिबंधावरचाच लघुनिबंध आपण वाचीत असल्यासारखें वाचकास वाटावें असा तो भाग आहे. लघुनिबंधाचें इतर ललितवाङ्मयप्रकारांपेक्षांहि विशेष असें कार्य सांगतांना मात्र थोडीशी अतिशयोक्ति झाल्यासारखें वाटतें. लघुनिबंधासहि इतर वाङ्मयप्रकारांप्रमाणेंच वैशिष्ट्याबरोबर मर्यादाहि आहेत. त्या मर्यादेंतच लघुनिबंधाचें सगळें कर्तृत्व व्यक्त होणार. वाङ्मयप्रकाराच्या तात्त्विक विवेचनाच्या प्रसंगीं अशा दृष्टीने प्रतवारी लावणें फारसें लाभदायक नाही.

लघुनिबंधाचें इतर वाङ्मयप्रकारांशीं साम्य दाखवितांनाहि कांहीशी अशीच परिस्थिति झाली आहे. तीमुळे साधारण दर्जाच्या अभ्यासकाचा गैरसमज होण्याचा संभव आहे. परंतु या ठिकाणींहि प्रा. फाटक यांच्या अभ्यासांतील सूक्ष्मता दिसून येते.

लघुनिबंधाच्या विवेचनाच्या संदर्भाने वाङ्मय आणि सामाजिक परिस्थिति यांच्या संबंधाचें विवेचन प्रा. फाटक यांनी केलें आहे. तें विवेचन स्वतंत्रपणेंहि विचारणीय झालें आहे. सामाजिक जीवनांतील स्थित्यंतराचा वाङ्मयावर अंतर्बाह्य परिणाम होतो हें प्रा. फाटक यांचें मत आहे. तें त्यांनी विषयाची मर्यादा संभाळून परंतु स्पष्टपणें मांडलें आहे.

आधुनिक वाङ्मयांत लघुनिबंधाच्या दालनांत विहार करणाऱ्या मुख्य लेखकांच्या वैशिष्ट्याची ओळख करून दिली आहे.

प्रा. फाटक यांनी या वाङ्मयप्रकाराविषयी केलेलें अभ्यासपूर्ण विवेचन विशेषतः विश्वविद्यालयीन अभ्यासास अतिशय उपयुक्त आहे.

गं. भा. निरंतर.

## संकीर्णः—

**नवें शिक्षण**—[ सोविएट रशियांतील शिक्षणव्यवस्था ]— ले० प्रा. अ. रा. कामत; प्रका० देशमुख आणि कंपनी, १९१ शनिवार, पुणें २; मूल्य रु. ६.

नवीन सुरू झालेल्या राष्ट्रीय राजवटीला नव्या व तेजस्वी शिक्षणाची जरूरी आहे ह्याबद्दल विचारवंतांत दुमत नाही. स्वतंत्र हिंदुस्थानाच्या प्रगतीला पोषक व परकीय सत्तेमुळे उत्पन्न झालेल्या दोषांना मारक अशा प्रकारचें नवीन शिक्षण जनतेला देण्याची संधि सुदैवाने

राष्ट्राला आली आहे. ह्या वेळीं इतर प्रमुख राष्ट्रांनी शैक्षणिक विकास कोणत्या पद्धतीने केला तें तौलनिक दृष्टीने पाहणें उपयुक्त व मार्गदर्शक होईल. अशा पाहणीचें कार्य श्री. कामत यांनी आपल्या 'नवें शिक्षण' ह्या ग्रंथांत केलें आहे. रशियासारख्या पंचवीस वर्षांपूर्वी मागासलेल्या एका प्रचंड राष्ट्राने कोणत्या भगीरथ प्रयत्नाने जनतेला 'नवें शिक्षण' देऊन सामर्थ्यवान् व अग्रेसर केलें याचें साद्यन्त विवेचन ह्या पुस्तकांत आढळतें. श्री. कामत यांचा हा ग्रंथ शिक्षणक्षेत्रांत वावरणाऱ्या सर्व व्यक्तींनाच नव्हे तर इतर राष्ट्राभिमानी कार्यकर्त्यांनाहि उद्बोधक व स्फूर्तिदायक होईल यांत शंका नाही. डॉ. खेर यांनी म्हटल्याप्रमाणे 'स्वातंत्र्याच्या देहलीवर पदार्पण करून नवीन युगांतील आपल्या राष्ट्राच्या शिक्षणाकडे पाहणाऱ्या भारताला हा ग्रंथ अगदी योग्य वेळीं उपलब्ध करून दिल्याबद्दल प्रा. कामत यांचें समाजाने अभिनन्दन केलें पाहिजे व त्यांच्या ग्रंथाचें अगत्यपूर्वक स्वागत केलें पाहिजे.

प्रा. कामत यांचा हा प्रयत्न आणखीहि एक दृष्टीने स्वागतार्ह आहे. आज मराठी भाषेत शिक्षणशास्त्रविषयक व खऱ्या अर्थाने 'शैक्षणिक' असलेलीं पुस्तकें अगदीच थोडीं आहेत. व त्यांतस्या त्यांत सविस्तर माहिती देणारीं व तौलनिक पद्धतीने व व्यापक दृष्टीने लिहिलेलीं पुस्तकें तर जवळ जवळ नाहीतच. [ डॉ. खेर यांचें 'पाश्चिमात्य शिक्षणपद्धति' हें पुस्तक अपवादात्मक म्हणून गणतां येईल.] बी. टी. किंवा एस्. टी. सी. ह्या परीक्षेचा अभ्यास करणाऱ्यांच्याकरिता मराठींत लिहिलेलें 'शैक्षणिक वाङ्मय' नाहीच. अशा महर्गतेच्या परिस्थितींत प्रा. कामत यांनी हा ग्रंथ लिहून मोठीच अडचण दूर केली आहे.

कांही वर्षांपूर्वीचा रशिया व हिंदुस्थान ह्यांच्यामध्ये सामाजिक व राजकीय बाबतींत असलेलें साम्य मशहूर आहे. मात्र गेल्या २५-३० वर्षांत रशियाने सर्व क्षेत्रांत व विशेषतः शिक्षणक्षेत्रांत आश्चर्यकारक प्रगति करून हिंदुस्थानसारख्या मागसलेल्या राष्ट्रांना स्फूर्तिदायक संदेश दिला आहे. ह्या संदेशाचा विस्तार श्री. कामत यांनी ह्या ग्रंथांत केला आहे. झारशाही नष्ट झाल्यावर व सोविएट सरकार अधिकारांत आल्यावर काय भगीरथ प्रयत्न करण्यांत आले, आज हिंदुस्थानापुढे असलेल्या प्रश्नांपैकी पुष्कळसे प्रश्न ( प्रौढ शिक्षण, साक्षरता, शारीरिक व व्यवसायात्मक शिक्षण व प्रादेशिक भाषा व संस्कृति यांचें संवर्धन ) रशियाने कसे सोडविले, नव्या परंपरेकरिता नवा शिक्षकवर्ग कसा तयार केला, शाळेंतून बाहेर पडणारा प्रत्येक विद्यार्थी सुशिक्षित, कार्यतत्पर व जाणता नागरिक व्हावा म्हणून कोणत्या राष्ट्रव्यापी पण एकध्येयी योजना अंमलांत आणल्या ह्या सर्व गोष्टींची बोधप्रद व कांही ठिकाणीं मनोरंजक असलेली माहिती ह्या ग्रंथांत दिलेली आहे. तेराव्या प्रकरणांत केलेलें समालोचन ( 'सोव्हिएट शिक्षणाचे विशेष' ) अभ्यसनीय आहे. ज्यांना सर्व ग्रंथ वाचणें शक्य नसेल त्यांनी व विशेषतः पालक व पुढारी यांनी हें प्रकरण तरी अवश्य वाचावें व त्यावर विचार करावा. त्यामुळे शिक्षणाकडे पाहण्याची त्यांची दृष्टि बदलेल यांत शंका नाही. 'इतर राष्ट्रांच्या मानाने आपणांस बराच मार्ग आक्रमावयाचा आहे. मात्र तो इतर राष्ट्रांप्रमाणे आपणांस सावकाश आक्रमितां यावयाचा नाही. त्यासाठी आपल्याला वेगवान् योजनाबद्ध प्रगतीचें धोरण स्वीकारावें लागेल.' श्री. कामत यांनी त्या प्रकरणाच्या शेवटीं काढलेला हा निष्कर्ष सर्वमान्य होईल यांत शंका नाही. त्याचप्रमाणे 'स्वातंत्र्याबरोबरच शिक्षण व संस्कृति यांच्या अमर्याद व अनिर्बंध विकासाला पोषक अशी समाजपद्धति असेल तरच सर्व जनतेची खरी प्रगति होईल,' हेंहि विधान, जरी ही समाजपद्धति कोणत्या तऱ्हेची असावी त्याबद्दल दुमत असलें, तरी यथार्थ व

चिंतनीय आहे असें प्रत्येक वाचकास वाटेल. प्रगतिप्रिय असलेल्या इंग्लंडसारख्या राष्ट्रांत अजून शिक्षणक्षेत्रामध्यें प्रा. जोड ( C. E. M. Joad–About Education ) यांनी वर्णन केलेली शिक्षणांतील विषमता ( two ladders ) रशियन राष्ट्राने कशी घालवून टाकली ह्याबद्दलचें विवेचन मार्मिक व बोधप्रद आहे.

पुस्तकाच्या शेवटीं रशियांतील जीवनक्रमनिदर्शक सुंदर चित्रें दिलेलीं आहेत. तीं पाहून भारतीय जीवन ह्या स्थितीला केव्हा पोहोचेल अशाबद्दल विचारपरंपरा उत्पन्न होते.

मात्र पुस्तकांत कांहीं ठिकाणीं पुनरुक्ति झाली आहे. व ह्याची जाणीवहि लेखकास आहे असें दिसतें. त्याचप्रमाणे रशियन पद्धतींतहि काही दोष आहेत व ह्या नव्या शिक्षणांत पुष्कळशा जुन्या गोष्टीहि आढळतात ह्याची दखलगिरी लेखकाने जितकी घ्यावयास पाहिजे होती तितकी घेतली नाही असें कांहींना वाटणें साहजिक आहे. काही माहिती गाळून व पुनरुक्तीचा दोष टाळून ग्रंथ लिहिला असता तर विस्तारामुळे पुस्तकाला जी किंमत ठेवली आहे ( व जी साधारण वाचकांच्या व विशेषतः शिक्षकाच्या आवाक्याबाहेर आहे असें वाटतें ) ती कमी करतां आली असती. दुसऱ्या आवृत्तीच्या प्रसंगीं ( व ती लौकरच निघेल अशी आम्हांला आशा आहे ) कांहीं अनवश्यक भाग गाळून व पृष्ठसंख्या मर्यादित करून किंमत कमी केल्यास हें उपयुक्त पुस्तक विकत घेणें सोईचें होईल.

**नी. वा. किंकर.**

**भगवान् बुद्धासाठी**— लें० शंकर दत्तात्रेय देव; प्रका० सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य ३॥ रुपये.

क्रमिक पाठ्य पुस्तकांतून आपण ह्युएन्त्संग व फाहियान या चिनी यात्रेकरू प्रवाशांचीं नांवें वाचलीं आहेत. त्यांपैकी पहिल्याच्या प्रवासाचा या ग्रंथांत सरस अनुवाद केलेला आहे. भारतीय प्रवाशांच्यामध्ये नसलेली एक मोठी गोष्ट आपणांस चिनी यात्रेकरूंत दिसते व त्यामुळे त्यांच्या माहितींत पूर्णपणा व विश्वासार्हपणा आलेला असतो. ती गोष्ट म्हणजे प्रवासाचा वृत्तान्त लिहून ठेवण्याची पद्धत. स्वतः लेखकाला अशा भारतीय प्रवाशांनी लिहिलेली माहितीहि मिळविण्याची इच्छा झाली होती, पण तशा लिखाणाच्या अभावामुळे ती अपूर्ण राहिली. अहमदनगरच्या किल्ल्यात अटकेंत असतां श्री. शंकरराव देवांनी आपला अभ्यास चालू ठेवला होता. त्या वेळीं अत्यंत लीन वृत्तीने त्यांनी हा माहितीचा मधु निरनिराळ्या ग्रंथांतून गोळा केला व मराठी वाचकांपुढे स्वतंत्र ग्रंथरूपाने ठेवला आहे. आणि या मधूची चव उत्तम आहेच, पण ज्यांतून तो वाचकांना मिळतो त्या पात्राची कलाकुसरहि मनोवेधक साधली आहे.

स्वतः धर्मनायक ( ह्युएन्त्संग ) मोठा पंडित होता. विचक्षणबुद्धीने समजून घेऊन त्याने बुद्धधर्माचा प्रसार चालविला होता. अशा पंडिताला तथागत मैत्रेय बुद्धाची जन्मभूमि व कर्मभूमि यांचें दर्शन घ्यायची तळमळ असणें अगदी स्वाभाविक आहे. या प्रवासाला निघतांनाच त्याला अडचण आली. चीनचा बादशाह त्याला रेताड वाळवंटातून प्रवास करण्यास परवानगी देईना तेव्हा तो बादशाहाच्या चौकी पहाऱ्याना चुकवीत चुकवीत अनंत हालअपेष्टा सोशीत निघाला. जणू अंतच नसलेल्या त्रस्त भूमींतून प्रवास करीत असताच्या त्याच्या भावनाचें वर्णन खरोखर अत्यंत तन्मयतेने केलेलें आहे. ‘अनंत मरुभूमींतून’ हें सर्व प्रकरण रसिकतेने व जिव्हाळ्याने लिहिलेलें आहे.

अनुक्रमणिका

हें सर्व प्रवासवर्णन एक अनुपम ऐतिहासिक ठेवा आहे. अंधारयुगांतील भारताच्या जीवनावर त्यामुळे कांहीसा प्रकाश पडतो. पण सर्वांच्या सर्व वृत्तान्त शास्त्रीय वस्तुपर वृत्तीनेच लिहिला गेला असणें शक्य नाही. एक अतिशय श्रद्धावान् जीव अदम्य उत्साहाने आणि तळमळीने तथागताच्या पवित्र भूमींत तीर्थाटन करावयास निघाला आहे तेव्हा त्याची मनोवृत्ति भाविक असणें स्वाभाविक आहे. या दृष्टीनेंच त्रिसाव्या शतकांतील वाचकांनी त्याकडे पाहावयाचें आहे. वाळवंटांतील 'जंगली घोड्यांच्या झऱ्या' संबंधीचा दैवी चमत्कार, पावना गंगेच्या परिसरांत क्रूर लुटारूंच्या हातून झालेली अलौकिक सुटका, अशोकाने भरविलेल्या धर्मपरिषदेंतील धर्मनायकाने गाजविलेला बौद्धिक पराक्रम इत्यादि प्रसंगीं आढळणाऱ्या कित्येक गोष्टी श्रद्धेच्या पोटीं निर्माण झालेल्या असणें स्वाभाविक आहे. या गोष्टींकडे रसिकाच्या सहानुभूतिपूर्ण नजरेने पाहणेंच योग्य होय. परंतु या गोष्टी सोडल्या तरीहि या वर्णनांत तत्कालीन देशस्थितीचें जें सामाजिक व भौगोलिक ज्ञान आपणांस होतें तेंहि फार महत्त्वाचें आहे. 'भरतभूमीवर पाऊल' या प्रकरणांत अशा तऱ्हेची माहिती दिलेली आहे. परंतु या पुस्तकांत कांहीं ह्युएन्संगचें स्वतःचें प्रवासवर्णनच फक्त दिलेलें नाही. त्याच्या अनुषंगाने इतरांचें वर्णनहि त्यांत आहे. फाहियान, इत्सिंग इत्यादींनी जे स्थलमार्गाने व जलमार्गाने प्रवास केले त्यांचेंहि संक्षिप्त वर्णन दुसऱ्या भागांत आहे. व हें सर्व लेखकानेहि फार भाविक आणि श्रद्धामय अंतःकरणाने लिहिलें असल्याची साक्ष पदोपदीं मिळते. या मराठी ग्रंथाची फलश्रुतीहि धर्मनायकाच्या मूळ शब्दांतच सांगतां येईल. धर्मनायक परत चीनला गेला त्या वेळीं त्याने खोतानहून बादशाहाला जें पत्र पाठविलें त्यांत पुढील उद्‌गार आहेत, तेच त्याच्या व श्री. देव यांच्याहि श्रमांचें समर्पक रीतीने वर्णन करतील.

"विद्येच्या शोधार्थ दूर दूर जाणाऱ्या प्राचीन थोर गुरुजनांचा जर आपण गौरव करतों तर मग संसारपाशांतून मुक्त करण्यास समर्थ असणाऱ्या बौद्धांच्या लाभदायी धर्माच्या पवित्र पदचिन्हांचें आणि त्रिपिटकांतील अद्‌भुत पदांचें संशोधन करणाऱ्यांचा केवढा गौरव केला पाहिजे! ...धैर्याने संकटांना आणि अडथळ्यांना तोंड देत गुप्तपणें मीं भारताचा रस्ता धरला, मीं मोठमोठीं वाळवंटें पसार केलीं, सुळक्यांसारखे उंच बर्फाच्छादित पर्वतकडे चढून गेलों,...सप्तसमुद्राच्या प्रचंड लाटांजवळून गेलों,...परंतु चालीरीतीचे हजारों भेद आणि हजारों संकटें यांना न जुमानतां मी परत आलों आहें...मीं गृध्रकुटाचें दर्शन घेतलें, बोधिवृक्षाची पूजा केली, अदृष्टपूर्व अशीं पदचिन्हें मला पाहावयास मिळालीं, अश्रुतपूर्व अशा पवित्र शब्दांचें श्रवण मला घडलें. सृष्टीच्या अद्‌भुततेला मागे सारणाऱ्या विलक्षण साधुपुरुषांचें दर्शन मीं घेतलें...."

शिवाय अनेक दुर्मिळ धर्मग्रंथांचें ज्ञान मिळवून तें त्याने चीनच्या ज्ञानभांडारांत टाकलें व तेथूनच तें परत हिंदुस्थानांत आणावें लागलें! अशा या 'वर अनंत आकाश आणि खालीं अनंत मरुभूमि यांमधून केवळ आपल्या सावलीच्या सोबतीने अनंत पथ आक्रमिणाऱ्या' परमश्रद्धावान् व बुद्धिवान् चीन-पुत्राने 'भगवान् बुद्धासाठी' जे अनंत साहसी प्रयत्न केले ते मानवी इतिहासांतील एक महत्त्वाचा भाग होऊन बसले आहेत. त्यांची इतकी सुरस मांडणी करून तें महाराष्ट्राला दिल्याबद्दल वाचक लेखकाला धन्यवाद देतील.

ना. ग. जोशी.

**खिस्तधर्मीयांस गांधींचें आह्वान**--अनु० व प्रका०—शंकर विनायक ठकार, पश्चिम खानदेश, भिल्ल सेवामंडळ, पोष्ट नंदुरबार; मूल्य साडेतीन रुपये.

एस्. के. जॉर्ज हे केरळप्रांतीय हिंदी खिस्ती. विद्यार्थिदशेपासून त्यांच्या मनावर गांधींच्या तत्त्वज्ञानाचा पगडा बसून तो पुढे फार दृढ झाला. त्यांनी १९३९ मध्ये Gandhi's Challenge to Christianity ह्या नांवाचा ग्रंथ लिहिला. त्याचा अनुवाद रा. ठकार ह्यांनी करून नुकताच प्रकाशित केला आहे. सहा सात वर्षांपूर्वीच्या विचारांना पूर्णता आणण्यासाठी रा. ठकार ह्यांनी मूळ लेखकाकडून एक पुरवणी लेख आणवून तोहि ह्या अनुवादाला जोडला आहे. पूज्य विनोबाजी भावे यांचा पुरस्कार, आचार्य कालेलकरांचा उपन्यास, जोसेफ सी. कुमारप्पा ह्यांचें निवेदन ह्यांची जोड ह्या अनुवादाला लाभल्यामुळे पुस्तकाला वैचारिक भरीवपणा आला आहे. खिस्ती तत्त्वज्ञानाची परिणति म्हणजे गांधीवाद असा मूळ लेखकाचा निष्कर्ष आहे. लेखक धर्माचा गाढ व्यासंगी असल्यामुळे तौलनिक विचारांनी त्याने आपला निष्कर्ष प्रतिपादिला आहे. ह्याच दृष्टीने जवळ जवळ तीस पृष्ठांच्या टीपा अतिशय उद्बोधक आहेत. येशू खिस्ताचा अनुयायी हा गांधींचा अनुयायीच व्हायला पाहिजे; जो होत नसेल त्याला खिस्ती धर्माचें रहस्य उमगलेंच नाही; आज तात्त्विक अर्थाने खिस्ती म्हणविणारे आपल्या धर्मापासून च्युत झालेले आहेत. गांधींच्या देहीं खिस्ताचें पुनरुत्थान झालें आहे. क्रुसाचें अर्थात् आत्मक्लेशाचें तत्त्व कृतींत उतरविणाऱ्या गांधींचें जीवन म्हणजे खिस्ती धर्माला एक आव्हानच आहे, असा ग्रंथाचा आशय असून, गांधीवाद आकलन व्हायला ह्या पुस्तकाचा चांगला उपयोग होईल.

य. दि. पें.

**मुद्रणकला**—ले० व प्रका० ग. पां. विजापुरे, किर्लोस्करवाडी; पृष्ठें १७९ + ११.

किर्लोस्कर मुद्रणालयाचे अनुभवी व्यवस्थापक श्री. गणपतराव विजापुरे यांनी मराठींतील मुद्रणकलेवरील वाङ्मयात वरील पुस्तकं लिहून मोलाची भर घातली आहे. श्री. मामाराव दाते यांचें मुद्रणप्रवेश हें पुस्तक फक्त जुळणीपुरतेंच मर्यादित आहे. समग्र छपाईवर मराठींत नांव घेण्याजोगें पुस्तक नव्हतें. श्री. विजापुरे यांना पृष्ठसंख्यामर्यादेमुळे प्रत्येक विभागाचा विस्तृत परामर्श घेतां आलेला नाही. परंतु अद्ययावत् मुद्रणप्रकारांची त्यांत योजल्या जाणाऱ्या सामग्रीची आणि यंत्रांची त्यांनी त्रोटक माहिती दिली आहे. विपुल चित्रें दिल्यामुळे विषय समजावयास सोपा झाला आहे. स्कूल लीव्हिंग सर्टिफिकेट परिक्षेकरिता मुद्रणकला हा विषय ठेवण्याची योजना तूर्त चालू आहे. अशा वेळीं या पुस्तकाचा फारच उपयोग होईल. एक उणीव मात्र दाखविल्यावांचून राहवत नाही. आणि ती म्हणजे ठिकाठिकाणीं योजलेल्या इंग्रजी शब्दांना मराठी पारिभाषिक शब्दांची. श्री. दात्यांनी आपल्या पुस्तकांत बरेच मराठी शब्द बनवून योजिले होते. साहित्यपरिषदेच्या परिभाषामंडळानें कांही शब्द (जुळणी खात्यापुरते) निश्चित केले होते. ते मुद्रणप्रकाश मासिकांत प्रसिद्धहि झाले आहेत; आणि लवकरच पूर्ण कोश प्रसिद्धहि होईल अशी उमेद आहे. प्रस्तुत पुस्तकाच्या पुढील आवृत्तींत श्री. गणपतराव ही उणीव भरून काढतील अशी आशा आहे.

बापूराव नाईक

---

"मराठी व्युत्पत्तिकोश" या प्रा. कृ. पां. कुळकर्णी यांच्या ग्रंथास श्रीमंत पंतसचिव विनायकराव घोरपडे, राजसाहेब, इचलकरंजी, ह्यांनी ३५० रु. चें पारितोषिक दिलें.

म. सा. प. (२०-२-७)

# संपादकीय

**संपादकीय जबाबदारीः**—म. सा. पत्रिकेचें संपादकीय आसन मजकडे आल्या-नंतरचा पहिला अंक पाहून ज्यांनी मला अभिनंदनपर पत्रें पाठविलीं त्यांचा मी आभारी आहें. त्यांत कांही ममत्वाचा तर कांही उपचाराचा भाग असणें शक्य आहे. तथापि ममत्व व उपचार ह्यांनी उत्साहाची ज्योत तेवत राहते. ह्या संपादकीय जबाबदारींत मी अपात्र असून, मीं हिचा त्याग करावा असाहि कोणी सल्ला देतो. माझ्या अपात्रतेची जाणीव मला आहे, हें गेल्या अंकां-तील स्फुटावरून स्पष्ट झालें असेल. जाणिवेची ती भाषा विनयाची नव्हे, किंवा शिरस्त्याची नव्हे, हें मात्र इथे स्पष्ट करायला हवें. ती प्रांजळ जाणीव बोथट होऊं नये अशी माझी इच्छा असल्यामुळे त्यागाचा सल्ला देणाऱ्यांचाहि मी आभारीच आहें. अपात्रतेच्या जाणिवेने कांही धडपड होत राहील. पत्रिकेचें यशापयश तिच्या ऋणानुबंधी व्यासंगी, चिकित्सक, संशोधक लेखकांच्या लिखाणाकडे आहे. अशा लेखकांनी पत्रिकेला यश देण्याऐवजी मला अपयश देण्याचा कट केला असेल, असें मला वाटत नाही.

—पण ह्या विद्वद्वर्यांच्या पुण्याईने मी तरूनहि जाणार नाही कशावरून ?

* * * *

**संपादकीय कामगिरी** अवघड आहे. तशीच ती नाजुकहि आहे; आणि नाजुक-पणामुळे अधिक अवघड आहे. संपादकीय आसनाबरोबर कांही अधिकार येतात. त्या अधि-कारांचा उपयोग करण्याची पाळी आली म्हणजे ह्या अवघडपणाचा प्रत्यय येतो. प्रत्येक लेखकाचें लिखाण त्याच्या अभ्यासाचा व परिश्रमाचा परिपाक होय. अर्थात् त्याला धक्का न लागण्याबद्दल त्याचा आग्रह असणें स्वाभाविकहि आहे. पण संपादकाला अनेक गोष्टींकडे अवधान द्यावें लागतें. काळ—काम—वेगाचीं उदाहरणें त्याला सोडवावीं लागतात आणि तीं नेहमीच सम नसतात—अनेकदा विषमच असतात. कालमान, द्रव्यबळ, लोकसंग्रह ह्या साऱ्यांचा समन्वय घालायचा आणि ध्येयाची चाकोरी सोडायची नाही, अशी कसरतच त्याला करावी लागते. अशा वेळीं त्याला संपादकीय अधिकारांचा आश्रय करावा लागतो—अनधि-कारीपणानेहि ते गाजवावे लागतात. पण अपरिहार्यपणें त्याला ते गाजवावे लागले असतील व ते गाजवतांना त्याच्या मनाला कष्ट पडले असतील एव्हढी उदार जाणीव लेखकांनी ठेवावी असें तो अपेक्षितो. पत्रिकेचे लेखक असेच जाणकार असतील, असा भरवसा आहे.

* * * *

**रवीन्द्रस्मृति व प्रा. सुशिलकुमार देः**—मागील अंकांतील ह्या स्फुटाकडे लोकांचें लक्ष गेलें व कांही नादनिनाद उमटले, हें बरें झालें. ह्याच अनुसंधानाने ह्या अंकांतील ''गीतांजली''वरील परीक्षण वाचावें. प्रो. दे ह्यांच्या विधानाबाबत त्यांत केलेलें मतप्रदर्शन बाटल्यास मीं संपादकीय अधिकारांत वगळावें अशी श्री. जोशी ह्यांनी मला परवानगी दिली होती. ती त्यांची औदार्यबुद्धि होय. पण प्रो. दे यांचें व्याख्यान वाऱ्यावर विरून जाऊं नये, शास्त्र्यांच्या कानांवर तें घालावें, ह्या उद्देशापलीकडे मला अन्य अभिनिवेश नसल्यामुळे श्री. जोशी ह्यांचा अभिप्राय संपूर्णपणें देण्यांत आला आहे. ''रवीन्द्रांच्या सांनि-ध्यांत घरगुती स्वरूपांत आपणांस दिनानुदिन काळ घालवायला मिळाला'' ह्या बळांवर केलें गेलेलें विधान पारखून घ्यायला हवें; शाते तें घेतीलच.

* * * *

अनुक्रमणिका

**मास्टर विनायकः—** मराठी चित्रपटांच्या निर्मितींत ध्येयदृष्टि ठेवून काम करणारा प्रथमश्रेणीतला हा कलावंत एकाएकीं अकालीं कालवश व्हावा हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय. ध्येय व धनोत्पादन ह्यांचा मेळ बसत नाहीं. धनोत्पादनाला प्राधान्य देऊन, नव्हे त्याच्या पूर्ण आहारीं जाऊन, ध्येयाला डावलणारे व्यवहारी कलावंतच फार. ध्येयाच्या दीपशिखेवर स्वतःला होरपळून घेणारा कलावंत एखादाच. अशा कलावंतांचें अपयशहि कलेचा दर्जा वाढवीत असतें. मास्टर विनायक हे अशा प्रकारचे कलावंत होते. त्यांच्या निधनानें ध्येयप्रधान मराठी चित्रपटांच्या निर्मितीला जबर आघात झाला आहे.

**कवि BEE ह्यांचा स्वर्गवासः—** श्री. नारायण मुरलीधर गुप्ते उर्फ कवि BEE ह्यांची इहलोकयात्रा ता. २९ ऑगष्ट रोजीं उत्तररात्रीं पावणेदोन वाजतां एकाएकीं संपली (तारखेची शहानिशा करून घेतली असून, हीच 'काळ-वेळ' बरोबर आहे). ही वार्ता ऐकून शोकाकुल झाला नसेल असा महाराष्ट्रीय रसिक विरळा. ह्या वर्तमानपत्री युगांत आपला अलोट गाजावाजा करून घेणाऱ्या साहित्यिकांपैकीं कवि BEE नव्हते. त्यामुळे त्यांच्या नांवाचा तसा जयघोष हमेशा होत नव्हता. पण त्यांच्या काव्यगुणसंपदेच्या 'मूल्याविषयीं रसिकांना नीटशी जाणीव नव्हती, असें मात्र नाहीं.

श्री. गुप्ते ह्यांची सारी हयात विदर्भांत गेली. त्यांचा जन्म १८७२ मधील; म्हणजे मरणसमयीं ते पाऊणशे वर्षांचे होते. लाभलेल्या आयुर्मर्यादेच्या मानानें BEE ची काव्यनिर्मिति मात्र माफकच म्हटली पाहिजे. 'फुलांची ओंजळ' हा त्यांचा एकुलता एक कवितासंग्रह. प्रथम तो १९३४ मध्ये प्रसिद्ध झाला. त्याची दुसरी आवृत्ति नुकतीच—म्हणजे BEE दिवंगत झाल्यानंतर—निघाली आहे. ह्या आवृत्तींत अखेर काळांतील कविता समाविष्ट करण्यांत आल्या आहेत. अशी ही एकुण काव्यनिर्मिति दीडशे पृष्ठेंच आहे. तथापि प्रतिभाशाली कविप्रकृति बहुप्रसवा असतेच, असें नाहीं. डोळ्यांत भरणारें वैशिष्ट्य संख्येपेक्षा गुणांतच असतें. आणि तेंच खरें वैशिष्ट्य. अध्यात्माच्या अधिष्ठानानें BEE च्या काव्यगुणांना कांहीं आगळें तेज आलें आहे.

पिकलें पान निसर्गनियमानेच गळलें असलें तरी ह्या पिकल्या पानांत काव्यरसाचीं स्पंदनें अखेरपर्यंत चालू होतीं, हें विशेष होय. प्रतिभेचा वसंत आणि मानवी आयुष्यांतला वसंत ह्यांचें साहचर्यच असतें, असें नाहीं. पुष्कळांच्या बाबतींत तें असल्यासारखें वाटतें. पण प्रतिभेचा वसंत कोळपून जायला इतर कारणें असतात. तीं अवांतर कारणें बलवत्तर झालीं तर आयुष्याच्या वसंतकाळींहि प्रतिभा मोहरणार नाहीं. उलट 'ढळला रे ढळला दिन सखया' असें म्हणण्याजोगी आयुष्याची मजल गांठली असतांनाहि प्रतिभेला मोहर येणें शक्य आहे. अगदी ताजें उदाहरण रावसा. र. लु. जोशी ह्यांचें आहे. तारुण्य किंवा वार्धक्य ह्यांचेकडे बोट दाखवून कर्तृत्वाबाबत कांहीं सिद्धान्त काढूं नये. No, you are not too young: Pitt was Prime Minister at 23. No, you are not too old; Gladstone was Prime Minister at 83. हाच न्याय प्रतिभेलाहि लागू करतां येईल. प्रतिभेच्या प्रस्फुरणाला वयाची आडकाठी नसावी. एरव्ही, BEE च्या हातून गेल्या वर्षापर्यंत कविता झाली नसती.

—आणि म्हणून हें 'पिकलें पान' गळून पडण्यानेंहि हानीच झाली आहे.

---

# परिषद्वार्ता

( चिटणिसांकडून )

**विनंती**—परिषदेचें नवीन वर्ष सुरू होऊन महा महिने झाले आहेत. ज्यांनी अद्याप १९४७-४८ ची वर्गणी पाठविली नाही त्या सभासदांनी आपली वार्षिक वर्गणी रु. ३ म. ऑ. ने अगर अन्य रीतीने कार्यालयाकडे सत्वर पाठवावी. मागील वर्षाची बाकी असल्यास तीहि कृपा करून पाठवावी.

**स्मृतिदिन**—परिषदेचे माजी अध्यक्ष कै. वा. म. जोशी यांच्या चतुर्थ स्मृतिदिनानिमित्त रविवार दि. २०।७।४७ रोजीं विल्सन कॉलेज ( मुंबई ) मधील मराठीचे प्राध्यापक वा. ल. कुलकर्णी यांचें "दोन महायुद्धांमधील मराठी वाङ्मय" या विषयावर व्याख्यान झालें. ( प्रस्तुत व्याख्यान 'मौज'च्या रौप्यमहोत्सव अंकांत आलें आहे. )

**व्याख्यानें**—लंडन येथील प्राच्यविद्या संस्थेतील प्राध्यापिका मिस् लँबर्ट यांचें शनिवार दि. ९।८।४७ रोजीं "प्राच्यविद्या संस्था व तिचें कार्य" या विषयावर मराठींत व्याख्यान झालें. रविवार दि. २४।८।४७ रोजीं फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल डॉ. दि. धो. कर्वे यांचें "परमाणु आणि शक्त्युत्पादन" या विषयावर व्याख्यान झालें.

**भेट**—पुणें जिल्ह्याचे कलेक्टर व परिषदेचे एक सभासद श्री. स. गो. बर्वे, आय्. सी. एस्., यांनी बुधवार दि. ३०।७।४७ रोजीं परिषदेस भेट दिली. पुण्याचे नगराध्यक्ष श्रीमंत बाबुराव सणस यांनीहि भेट दिली. दोघांहि मान्यवरांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यांत आला.

**परिभाषा चर्चा मंडळः**—'ॲटम बॉंब्'– अणुबम् याचें महत्त्व ध्यानांत घेऊन परिभाषा मंडळाने आवश्यक परिभाषा तयार केली व चर्चामंडळाच्या चारपांच बैठकींतून ती खुलासेवार मांडली. या बैठकींत डॉ. मो. ल. चिपळूणकर, प्रा. बर्वे, जोग, महाजन, केळकर दत्तोपंत लिमये, त्र्यं. गो. ढवळे, शंकरराव गोखले इत्यादिकांनी भाग घेतला. सिद्ध झालेली परिभाषा प्रा. आपटे यांनी इतर संस्थांच्या वतीने झालेल्या तीनचार व्याख्यानांत वापरली व तिचा उपयोग पडताळून पाहिला. शास्त्राभ्यासकांच्या विचारासाठी लेखरूपाने 'पत्रिके'च्या गेल्या अंकांत व या अंकांत ही प्रसिद्ध केली आहे.

**शंभर अंकांना समुदायवाचक नांवें**:—मुंबईचे श्री. वि. ग. ताम्हनकर यांनी 'परिभाषा चर्चा मंडळा'च्या एका बैठकींत मराठी अंकांना समुदायवाचक नांवें असण्याची आवश्यकता प्रतिपादिली, आणि पाढ्यांत येणारे एका-एके, दुणा-दुणे, त्रिक, चोक, पंचा-पंचे सक, सत्ता-सत्ते इत्यादि शब्दांचे अर्थ समुदायवाचकच आहेत,—एका-एकांचा समुदाय, दोहो-दोहोंचा समुदाय अशा अर्थाचेच आहेत असें आपलें म्हणणें मांडलें. या बैठकींत डॉ. मो. ल. चिपळूणकर, डॉ. श्री. द. लिमये, प्रा. स. वि. आपटे, प्रा. द. बा. लिमये, श्री. त्र्यं. गो. ढवळे इत्यादिकांनी चर्चेत भाग घेतला.

समुदायवाचक नांवें असणें इष्ट आहे असें सभासदांचें मत पडलें. मात्र श्री. ताम्हनकर यांनी सुचविलेली व्यवस्था इष्ट कीं अनिष्ट याविषयी अधिक चर्चा होणें आवश्यक असल्यामुळे, व्युत्पत्तिवेत्ते आणि प्रत्यक्ष शिक्षण पत्रिकेच्या कार्यकर्ते यांनी या विषयांत अधिक लक्ष घालून तिची युक्तायुक्तता ठरवणें आवश्यक आहे. श्री. ताम्हनकर यांनी आपले विचार 'पत्रिके'च्या १९४२ च्या अंकांत विस्तृतपणें मांडले आहेत.

सातारा येथील वेस्टर्न लाइफ अिन्शुअरन्स या संस्थेच्या सूचनेवरून मंडळाने विमा-विषयक परिभाषा तयार करण्याचें ठरविलें आहे. तज्ज्ञांची प्राथमिक सभा होऊन कामास सुरवात झाली आहे.

**ग्रंथसंग्रहालय**—परिषदेच्या विनंतीला मान देऊन पुणें येथील कॉंटिनेंटल प्रकाशनचे रा. अनंतराव कुलकर्णी, देशमुख आणि मंडळीचे श्री. देशमुख, श्री. दत्तात्रय गणेश लाटे यांजकडून ग्रंथसंग्रहालयास पुस्तकांची भेट मिळाली. या देणगीबद्दल परिषद् वरील गृहस्थांची फार ऋणी आहे. परिषदेने स्वतःच्या खर्चानेहि टीकाशास्त्र, साहित्यशास्त्र इत्यादि विषयांवरील मराठी, इंग्लिश व संस्कृत ग्रंथ खरिदले असून ग्रंथसंख्या सुमारें अडीच हजार पर्यंत झालेली आहे.

**इतिहास योजना**—मराठी भाषा व वाङ्मय यांचा अधिकृत इतिहास लिहिण्या-संबंधीची योजना सभासदांना यापूर्वीच कळली आहे. अशा तऱ्हेचा इतिहास लिहिला जावा हा विचार परिषदेच्या कांही सभासदांच्या मनांत एकीकडे चालू असतांनाच दुसरीकडे स्वतंत्ररीत्या पुणें येथील वाडिया कॉलेजमधील प्रा. श्री. भि. वेलणकर यांच्या मनांतहि हाच विचार उत्पन्न झाला. परिषदेच्या कार्यकर्त्यांकडे त्यांनी स्वतः तयार केलेली विस्तृत योजना विचारासाठी पाठविली व असेंहि आश्वासन दिलें की परिषदेने हें काम करण्याचें ठरविल्यास आपण आर्थिक साहाय्य करूं. त्याप्रमाणे त्यांनी स्वतः व त्यांचे स्नेहि यांनी मिळून आता-पर्यंत रु. २००१ ही रक्कम याच कामासाठी परिषदेच्या स्वाधीन केली आहे. परिषद् या औदार्याबद्दल त्यांची ऋणी राहील. ( या कामांत आर्थिक साहाय्य करणाऱ्यांची नांवें सभा-सदांच्या यादींत आहेत. )

**वार्षिक समालोचन**—गतवर्षापासून परिषदेने चालू केलेली वार्षिक समालोचना-नात्मक व्याख्यानमाला येत्या नोव्हेंबर-डिसेंबरमध्ये व्हावयाची आहे. त्या प्रसंगीं अध्यक्ष म्हणून श्री. रा. अ. काळेले, सौ. कुसुमावती देशपांडे, श्री. दा. ना. आपटे, श्री. गोविंदराव टेंबे, प्रा. भाटे, प्रा. कृ. पां. कुलकर्णी, प्रा. क्षीरसागर, म. म. प्रा. पोतदार यांनी व व्याख्याते म्हणून प्रा. अदवंत, प्रा. निरंतर, प्रा. म. वि. फाटक, प्रा. रा. शं. वाळिंबे, प्रा. मंगळूरकर, श्री. गोपीनाथ तळवळकर, श्री. ग. ह. खरे इत्यादींनी संमति दिली आहे.

**परीक्षावर्ग**—परिषदेने चालविलेल्या वर्गांत प्राज्ञ ९० व विशारद ५० अशी उप-स्थिति आहे. कोल्हापूर साहित्यसभेतर्फे चाललेल्या वर्गास आर्थिक साहाय्य करून पुढील गृहस्थांनी परीक्षाकार्यास फारच मोठी चालना दिली आहे. प्रा. ना. सी. फडके ( रु. २५ ), श्री. वि. स. खांडेकर ( रु. २५ ), शेट प्रभाकरपंत कोरगांवकर ( रु. ५१ ), श्री. बा. रा. कोल्हटकर ( रु. १५ ), श्री. ल. दे. सुर्वे ( रु. ५ ), श्री. ब. द. जोशी ( रु ५ ), श्री. आ. गो. कामत ( रु. ३ ). सातारा, नगर, मुंबई, गिरगांव, दादर ( 'साधना' तर्फे ) इत्यादि अनेक केंद्रस्थानीं वर्ग चालू आहेत. सांगवी ( पू. खा. ) येथेहि शिक्षण प्रसारक मंडळातर्फे श्री. वि. श्रा. चौधरी यांनी वर्ग चालविले आहेत.

**कै. चिपळूणकर स्मारक मंदिर**—कै. चिपळूणकर स्मारक मंदिराच्या मदतीसाठी पुणें येथील उत्कर्ष मंडळाने २०।८।४७ रोजीं लिमये नाट्य-चित्र-मंदिरांत संगीत 'एकच प्याला' या नाटकाचा प्रयोग केला व त्या प्रयोगाला झालेलें उत्पन्न चिपळूणकर स्मारक समिती-च्या हवालीं केलें. या प्रसंगीं उत्कर्ष मंडळाचे चालक श्री. नेलेंकर व त्यांचे सहकारी महा-राष्ट्रांतील सुप्रसिद्ध नट श्री. नानासाहेब फाटक यांनी बहुमोल साहाय्य केलें. लिमये नाट्य-चित्र मंदिराचे मालक श्री. लिमये यांनीहि आपलें नाट्यगृह विनामूल्य देऊन समितीला ऋणी केलें आहे. तिकिटविक्रीच्या बाबतींत ज्यांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष साहाय्य केलें त्या सर्वांचे आम्ही आभारी आहोंत. श्री. चंद्रकुमार डांगे, श्री. देशमुख इत्यादींनी केलेल्या साहाय्याचा निर्देश करणेंहि या प्रसंगीं आवश्यक आहे.

---

# नवीन सभासद

कै. चिपळूणकर स्मारकासाठी देणगी
दिल्यामुळे झालेले

## साहाय्यक

( १ ) श्री. रामचंद्र विष्णु जोशी, पुणें
(रु.५००) (तहहयातमधून साहाय्यक)

मराठी भाषा व वाङ्मय-इतिहासयोजने-
साठी देणगी दिल्यामुळे झालेले

## साहाय्यक

( १ ) श्री. रामचंद्र विनायक गोटीस्कर, मुंबई
( रु. ५०१ )

कै. चिपळूणकर स्मारकासाठी देणगी
दिल्यामुळे झालेले

## हितचिंतक

( १ ) श्री. जी. जी. पटवर्धन, पुणें २
( रु. २०० )

( २ ) श्री. दादासाहेब चितळे, फोर्ट, मुंबई
( रु. १५१ )

( ३ ) श्री. के. वि. केळकर, पुणें २
(रु.१०१) (तहहयातमधून हितचिंतक)

ग्रंथालयास रु. दीडशे किंमतीचे ग्रंथ
देऊन झालेले

## तहहयात सभासद

( १ ) श्री. मनोहर महादेव केळकर, पुणें २
( २ ) श्री. राम जयवन्त देशमुख, पुणें २
( ३ ) श्री. अनंत अंबादास कुलकर्णी, पुणें २

ग्रंथालयास देणगी दिल्यामुळे झालेले

( १ ) श्री. शंकर कृष्ण मराठे, न्यूयार्क
( रु. १०० )

कै. चिपळूणकर स्मारकासाठी देणगी
दिल्यामुळे झालेले

## तहहयात सभासद

( १ ) डॉ. एन्. जी. चापेकर, पुणें २
( रु. १०० )

( २ ) श्री. ल. ब. मोपटकर, पुणें २
( रु. १०० )

( ३ ) श्री. चिंतामण अनंत तुळपुळे, पुणें
( रु. १०० )

( ४ ) प्रो. त्र्यंबक भिकाजी हर्डीकर, पुणें
( रु. १०० )

( ५ ) श्री. विष्णु त्रिंबक टिळक, पुणें
( रु. १०१ )

( ६ ) श्री. हरि विठ्ठल तुळपुळे, पुणें ४
( रु. १०० )

[ साधारणमधून तहहयात ]

साधारण सभासदांचे तहहयात झालेले सभासद

( १ ) श्री. बापुराव शिवराम नाईक, पुणें
( २ ) डॉ. अमृत नारायण भालेराव, मुंबई

## नवीन तहहयात सभासद

( १ ) श्री. कृष्णाजी सदाशिव अभ्यंकर, कुर्ला
( रु. ५० )

( २ ) डॉ. अच्युत दत्तात्रय पुसाळकर, मुंबई
( रु. ५० )

## साधारण सभासद

( १ ) श्री. शंकर परशुराम भिडे, पुणें २
( २ ) श्री रघुनाथ रामचंद्र काशीकर, मुंबई
( ३ ) श्री. विश्वनाथ वामन पत्की, सातारा
( ४ ) श्री. नारायण दत्तात्रय देसाई, मुंबई
( ५ ) श्री. दत्तात्रय नारायण लोटलीकर
( संस्थान जव्हार )
( ६ ) श्री. कृ.गं. कवचाळे, देवास (सीनिअर)
( ७ ) श्री. श्रीकृष्ण सदाशीव पुराणीक
( चाळीसगाव )
( ८ ) श्री. वसंत पांडुरंग देशमुख, पुणें २
( ९ ) श्री. मनोहर अनंत देशपांडे, पुणें २
(१०) श्री. सदाशीव अनंत शुक्ल, मुंबई.
(११) श्री. भवानीशंकर श्रीधर पंडित, नागपूर
(१२) डॉ. विठ्ठल वासुदेव फडके, कल्याण
(१३) श्री. अनंत नारायण भावे, कल्याण
(१४) श्री. श्रीवल्लभ जनार्दन बापट, कल्याण
(१५) श्री. माणिकलाल गणपतसिंग परदेशी,
( पुणें )
(१६) श्री. विष्णु धोंडदेव गोरे, तासगांव
(१७) श्री. वासुदेव नरहर कुलकर्णी, वकील
खेड ( जि. पुणें )

---

# साभार स्वीकार

१ मधुघट ( कवितासंग्रह )—संपा० प्रा. गं. भा. निरंतर; प्रका० व्हिनस बुकस्टॉल, पुणें; मूल्य अडीच रु.

२ जादूची कुपी ( कादंबरी )—ले० प्रा. भा. म. गोरे; प्रका० दा. ना. मोघे; मूल्य अेक रु.

३ नवी वसाहत ( लघुकथासंग्रह )—प्रा. मा. म. गोरे; प्रका० दा ना. मोघे; मूल्य दोन रु.

४ हिरवळ ( लघुनिबंधसंग्रह )—ले० व संपा० वि. स. खांडेकर; प्रका० दा. ना. मोघे; मूल्य सव्वा रु.

५ तीन तपस्वी—ले० प्रभाकर पाध्ये; प्रका० दा. ना. मोघे; मूल्य दोन रुपये.

६ पुसलेलीं चित्रें ( कादंबरी )—लेखिका सौ. सुधा साठे; प्रका० श्री. वि. दामले; मूल्य साडेचार रुपये.

७ संस्कृत काव्याचे पंचप्राण--ले० डॉ. के. ना. वाटवे, प्रका० मनोहर ग्रंथमाला, पुणें; मूल्य सहा रुपये.

८ भगवान् बुद्धासाठी—ले० शंकरराव देव; प्रका० सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें; मूल्य साडेतीन रुपये.

९ आचार्य कृपलानी—अनुवा० माऊ धर्माधिकारी; प्रका० सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें; मूल्य तीन रुपये.

१० गुलाबाची हिंदुस्थानांत लागवड—लें० व प्रका० र. वि. सरवटे, ग्वाल्हेर; मूल्य अडीच रुपये.

११ सोव्हिएट दर्शन—( लेखसंग्रह ) युगवाणी प्रकाशन; मूल्य दोन रुपये.

१२ सोव्हिएत् राष्ट्रें व लोक—ले० दि. के. बेडेकर; चित्रशाळा प्रकाशन; मूल्य दहा आणे.

१३ कांहीं कविता—कवि बा. सी. मर्ढेकर; युगवाणीप्रकाशन; मूल्य दीड रुपया.

१४ साहित्य-विनोद-राजः ( पद्यसंग्रहः )—ले० शा. वि. राजे; प्रका० द. वि. पाठक, मुंबई ४; मूल्य दीड रुपया.

१५ वजनें व मापें-ले० प्रा. ना. वा. कोगेकर; अ. वि. गृह प्रकाशन; मूल्य चार आणे.

१६ अन्नदाता अुपाशी ( कादंबरी ) —ले० वि. वा. हडप; आदर्श वाङ्मय प्रकाशन; मूल्य अडीच रुपये.

१७ पेर्ते व्हा ( कवितासंग्रह )—कवि अनिल; प्रका० के. भि. ढवळे; मूल्य चार रुपये.

१८ जीवनगंगा ( कादंबरी )—ले० रघुवीर सामंत; प्रका० पारिजात प्रकाशन; मूल्य साडेचार रुपये.

१९ प्रमिलाबेन ( कादंबरी )—ले० रामतनय; प्रका० रा. ज. देशमुख. मूल्य चार रुपये.

२० अमृतबिंदु ( बोधकथासंग्रह )—ले० शं. द. भोसले; प्रका० आ गो. कामत; मूल्य बारा आणे.

२१ ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी—ले० प्रा. न. र. फाटक; प्रका० धरित्री प्रकाशन, मुंबई ४; मूल्य तीन रुपये.

२२ श्रीभगवद्गीता-व्याख्यान ज्ञानदेवी ( चिकित्सक व भाषाशास्त्रीय आवृत्ति ) संपा० व प्रका० रा. ग हर्षे; मूल्य साडेबारा रुपये.

२३ फुलांची ओंजळ ( द्वितीयावृत्ति )—कवि 'बी'; प्रका० ठाकूर आणि कंपनी लि. उमरावती; मूल्य साडेतीन रुपये.

२४ कुंपणावरून ( छाया नाट्य )—ले० श्री. बा. रानडे; प्रका० केशव भिकाजी ढवळे; मूल्य सव्वा रुपया.

२५ त्रिवेणीसंगम ( लघुकथासंग्रह )—ले० मा. वा. पाळंदे, प्र. न. जोशी व ग. बा. वेहेरे; प्रका० हेमराणी साहित्य किरण; मूल्य दोन रुपये.

२६ दंतकथा—ले० डॉ. अ. बा. वर्टी; प्रका० नॅशनल अिन्फर्मेशन अँड पब्लि-केशन्स लि., मुंबई १; मूल्य तीन रुपये.

२७ वयांत येणाऱ्या मुलींस—ले० नरहरि परीख; अनुवा० पां. ग. देशपांडे; प्रका० नवजीवन प्रकाशन मन्दिर, अहमदाबाद; मूल्य सव्वा रुपया.

२८ दूधसागर ( कवितासंग्रह ) कवि बा. म. बोरकर; प्रका० के. भि. ढवळे; मूल्य पावणेदोन रुपये.

२९ मायेच्या सांवल्या—ले० य. गो. जोशी; अनाथ विद्यार्थिगृह प्रकाशन, पुणें २; मूल्य सव्वा रु.

३० वंदनीय महाशय—ले० रमातनय; प्रका० रा. ज. देशमूख, पुणें २; मूल्य एक रुपया.

---

## "मौज"चा रौप्य महोत्सव

लवकरच दिवाळी अंकाची लयलूट होईल. सण घरोघर साजरा करण्यांत येतो. नियत-कालिकांच्या व्यवहारांतहि तोच न्याय अनुसरला जावा हें स्वाभाविक आहे. पण वैपुल्यांत स्वारस्य कमी, हेंहि कांहीं खोटें नाहीं. पक्वान्नें हीं पक्वान्नेंच होत; पण भोंक्त्याची भूक मागल्यावर त्यांची चव काय ?

पण ह्या वैपुल्याची स्वारस्यहीनता "मौज" रौप्य-महोत्सव विशेषांकाच्या वांट्याला आली नाहीं. १५ ऑगस्ट हा स्वातंत्र्यदिन. त्यानिमित्त कांहीं कमी विशेषांक निघाले नाहींत. पण 'मौजे'च्या आयुष्यांत तोच रौप्यमहोत्सवाचा सुदिन होता. तन्निमित्त निघालेला विशेषांक सर्वच दृष्टींनी 'विशेष' ठरला.

मौज आणि सत्यकथा हीं नियतकालिकें एकेकाळीं अगदी निकृष्ट स्वरूपाचीं होतीं. पण भागवतमंडळींनी त्यांत सबाह्यान्तर फरक घडवून आणला. तो इतका की आज हीं दोन्ही नियतकालिकें उत्कृष्ट ठरलीं आहेत. ह्या विशेषांकाच्या अंतरंगाबद्दल आता इतक्या उशीराने कांहीं तपशील देण्याची जरूरी नाहीं. सुबुद्ध वाचकांनी ती वाक्संपदा केव्हाच घरोघर लुटून नेली आहे. राष्ट्राच्या जीवनाचीं जीं अनेक अंगें-उपांगें आहेत त्यांच्या तज्ज्ञांनी त्या अंकांत जो आढावा घेतला आहे, जो परामर्श घेतला आहे, जें दिग्दर्शन केलें आहे, त्यामुळे तो अंक वाचकांना संग्राह्य आणि चालकांना भूषण झाला आहे. गुणरूपकर्तृत्वाचा विचार करतां "मौज" ह्या नांवापेक्षा कितीतरी पटींनी हें नियतकालिक चालकांनी वाढविलें आहे. भागवत-बंधूंनी संपादिलेल्या ह्या यशाबद्दल कोणीहि त्यांचें स्वयंस्फूर्तीने अभिनन्दन करील आणि म्हणेल की "शतायुषी भव."

—संपादक

मुद्रक— लक्ष्मण नारायण चापेकर, 'आर्यसंस्कृति मुद्रणालय,' १९८/१७ सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.

प्रकाशकः— रामचंद्र श्रीपाद जोग, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

अनुक्रमणिका

